श्री राम समर्थ.

# श्री संतसंघ पुस्तकमाला.

## भाग पहिला.



( पुस्तकमाला नंबर दोन. )

हें पुस्तक

मुंबई येथील

राम सेवक चित्रालयांतून

संपादक

कृष्ण जगन्नाथ थळी

यांनीं

छा० प्रसिद्ध केलें.

आवृत्ति पहिली.



शके १८३४ परिधावीनाम संवत्सर कार्तिक शु० १५ इसवी सन १९१२

किंमत दीड रुपया.



श्रीमंत महाराज सयाजीराव गायकवाड,

सेना खासखेल समशेरबहादुर.

जी. सी. एस. आय.

बडोदें.

श्रीराम समर्थ

श्रीमन्नृपति श्रीसयाजीराव महाराज गायकवाड
यांसी प्रेमपूर्वक

# ग्रंथार्पणपत्रिका.

---

## ओव्या

श्रीसंतसंघपुस्तकमालाकृती ।
अर्पण तुह्मां श्रीसयाजी नृपती ॥
ती घेऊनी भूपाला सुंदर हातीं ।
प्रेमें अवलोकन करावी ॥ १ ॥
श्री संतसंघपुस्तकावलोकन ।
करितां होवो मन समाधान ॥
भूमातेवरील संत सज्जन ।
दर्शित होवो तुह्मांलागीं ॥ २ ॥
प्रभुराय कृपाळु झाला ।
प्रभुरायें हा योग आणिला ॥
प्रभुरायें हा ळळा लाविला ।
नृपति तुह्मां सद्गुणाचा ॥ ३ ॥
बुद्धिप्रेरक श्रीभगवंत ।
यास्तव प्रेम आलें धांवत ॥
पुण्यशीला श्रीसयाजी बुद्धिवंत ।
दीर्घायु चिंतितों तुह्मांलागीं ॥ ४ ॥

नम्र बालक,

कृ. ज. थळी.

श्रीकमलेश्वर, श्रीमहालक्ष्मीप्रसन्न.

# श्रीराम समर्थ.

## ॥ अभंग ॥

सत्यसंकल्पाचा दाता नारायण । सर्व करी पूर्ण मनोरथ ॥ १ ॥
येथें अळंकार शोभती सकळ । भावबळें फळ इच्छेचें तें ॥ २ ॥
अंतरींचें बीज जाणे कळवळा । व्यापक सकळां ब्रह्मांडाचा ॥ ३ ॥
तुका ह्मणे नाहीं चालत तांतडी । प्राप्तकाळघडी आल्याविण ॥ ४ ॥

## स्वानुभवोद्गार.

## ॥ आर्या ॥

अंतरिं वृत्ती उठती । तेथें वसती तुझी असें कळलें ॥
वळलें मन वाग्देवा । श्रीसद्गुरु कृष्ण तूं असें कळलें ॥ १ ॥

हे मद्**श्रीकृष्णस्वरूपी** श्रीधनगरकुलोत्पन्न महाअनुभवसूर्या **श्रीसमर्थ वाग्देव महाराजा!** तुझ्या परम पवित्र व पावन अशा चरणकमलारविंदीं सदासर्वकाळ या तुझ्या चरणरजधुळीच्या बालकाचे अंतर्बाह्य अनंत प्रणिपात असोत.

हे समर्था! तुह्मां **संतांच्या** अनुपम लीलेचीं चरित्रें अवर्णनीय आहेत! तुमच्या लीलेच्या कृतीचा अंत मजसारख्या संसारांत बद्ध झालेल्या व अनेक व्यवहार करणाऱ्या मंदमती पामरास तुमच्या पूर्ण कृपेवांचून लागेल काय? तुमच्या महाप्रखर तेजोमय कृतीपुढें नेटानें टिकाव काढणारे कदाचित् **श्रीकल्याण, श्रीएकनाथ, श्रीकानिफनाथ, श्रीगोरखनाथ,** वगैरे ह्या वैराग्यपूरित व्यक्तींनीं पूर्वींच सादर होऊन या महाभयंकर दुःखप्रद संसारसुखावर तिलांजुली देऊन आपला पुण्य देह केवळ **श्रीसद्गुरुचरणीं** वाहिला! **श्रीरामदासस्वामी, श्रीजनार्दनस्वामी** वगैरेंसारख्यां **सद्गुरूंनीं** आपल्या **सच्छिष्यांची** कसोटी पाहण्याकरितां ठायीं ठायीं त्यांजवर महाघोर अनेक संकटें घातलीं, तरी त्या त्याच अशा **सच्छिष्यांनीं** आपल्या निरहंकारी एकनिष्ठ भावबळाच्या जोरावर बिलकूल न डगमगतां त्या त्या संकटांतून मुक्त होऊन **श्रीसद्गुरुकृपाबळानें स्वानंदसाम्राज्यपदारूढ होऊन स्वात्मतत्वामृताचा घोंट घोंटीत बसले बरें!** त्यांची **श्रीसद्गुरुचरणारविंदीं** वसत

असलेली जबरदस्त एकनिष्ठता, अतुल प्रेमा, आज्ञापालन करण्याची तत्परता, वगैरे वगैरे कृतींची आठवण या हृदयकमलांत आणून क्षणभर निवांत स्थानीं अंतरीं दृष्टी नेऊन विचार करीत बसलों असतां, ही जिव्हा मुकी पडून तर्क ठायींचे ठायींच नष्ट होऊन जातात ! व **श्रीसद्गुरु** आणि **सच्छिष्य** यांच्या सत्यासत्यतेचा निर्णय होऊन मन थक्क होऊन जातें.

हे मन्मोक्षपथ दाता **श्रीकृष्णस्वरूपी श्रीसमर्थ वाग्देव मायबाप !** आज ही **श्रीसंतसंघ**प्रसाराची कृती या हातून जी घडत आहे, ती केवळ तुझ्या बारा वर्षांतील निकट सान्निध्यानें आलेल्या अनुभवांचें द्योतक होय ! असें मला मिळालेल्या तुझ्या पदोपदींच्या अनुभवांवरून ह्मटल्यावांचून रहावत नाहीं !

हे अंतरसाक्षी परम दयाळू **श्रीसमर्थ वाग्देव मायबापा!** या तुझ्या पदरजधुळीच्या बालकाच्या प्राक्तनीं हा महाभयंकर प्रपंचशकट अनेक व्यवहार करून चालवून संगतीच्या जीवांचें निमित्त मात्र परिपोषण करणेचें सद्यःस्थितीवरून निश्चयानें भासत आहे! व तसा प्रकार या **अमोल देहाचें कलेवर होईपर्यंत,** कायमचा असलाच तर प्रस्तुत हातीं असलेल्या **"श्रीसंतसंघ"**प्रसाराच्या कृतीवांचून हें वीतभर पोट भरणेचें किंवा संगतीच्या जीवांचें परिपालन करणेचें अन्य साधन आणखी देऊं नकोस! **श्रीसंतसंघ**प्रसाराच्या कार्यांतच या **दुर्मिळ देहास** वागीव, ह्मणून तुझ्या चरणकमलीं हात जोडून काया, वाचा, मनानें प्रार्थना करितों. **"देह पडेल कधि न भरंवसा"** या **श्रीसमर्थ बांदकर** महाराजांच्या अनुभवोक्तीवर पदोपदीं लक्ष अखंड वेधत असल्यामुळें या नाशिवंत देहाचा व्यय कुमार्गानें न होतां, अशा प्रकारच्या कार्यांतच देहाचा व्यय व्हावा असा मनाचा विशेष ओढा लागत आहे! तुह्मां **ईश्वरमूर्ति श्रीसंतांच्या** हातीं सर्व कांहीं आहे, तुमची इच्छा झाल्यास अशा प्रकारचे हेतु पूर्ण होणें बिकट नाहीं!!

प्रिय भाविक बंधू हो, आधुनिक श्री**संतांचे अस्सल फोटो** मिळविण्यास बरीच खटपट होऊन **श्रीसंत**कृपेनेंच ते हस्तें परहस्तें प्राप्त झाले.

पहिल्या प्रथम **"अक्षरबोधश्रीसंतसंघ"** या नांवें **"श्रीसंतसंघ"** या पांच अक्षरांत व त्याच्या सभोवरील चौकटींत १०३ **संतांचे** लहान, लहान अस्सल फोटो, सात देवतांचीं चित्रें व कांहीं कविता घालून **"दुधाची तहान ताकावर भागविणें"** या ह्मणीप्रमाणें हाफ्टोन प्रोसेसनें **"अक्षरबोधश्रीसंतसंघ"** तयार केला. हा **श्रीसंत**कृपेनें हिंदुस्थानांतील गांवोगांवच्या **भाविक बंधूंस अत्यंत आवडल्याबद्दल** त्यांजकडून उत्तेजनपूर्वक पत्रें येऊन फोटो मोठ्या प्रमाणावर असावेत असेही त्यांचे प्रेमोद्गार लिहून येऊं लागले; त्यांजकडून आलेल्या उपयुक्त सूचना आह्मांस हितकर वाटल्यावरून मागाहून **"श्रीसंतसंघमालिका"** या नांवें,

तींत कार्डच्या आकाराचे प्रसिद्ध संतांचे नऊ फोटो घालून मालिका तयार केली. हीहि **"श्रीसंतसंघमाला"** समस्त **संतभक्तांत** प्रिय झाली आहे !

जगप्रिय, गुणग्राहक, सद्गुणमंडित, **श्रीमंत राजे श्रीसयाजीराव महाराज गायकवाड बडोदें**, यांनीं या **"अक्षरबोधश्रीसंतसंघ"** चित्रपटाचा प्रेमानें आदर करून यादस्तीनें आह्मांस **अत्यंत प्रेमभरित सर्वोत्कृष्ट अभिप्राय पाठवून श्रीकृपेनें** आरंभलेल्या **"श्रीसंतसंघ"**प्रसाराच्या कार्यांत उत्तेजन दिलें, याबद्दल **श्रीमंतांच्या** गुणग्राहकपणाचा आनंद घोंटून थोर आभारी झालों.

**चिकित्सक, केसरी, मुमुक्षु, ज्ञानप्रकाश, काळ** वगैरे वृत्तपत्रकारांनीं, **विविधज्ञानविस्तार, लोकमित्र, मनोरंजन, मराठामित्र** वगैरे मासिक पुस्तककारांनीं व थोर भाविक **विद्वान् सज्जनांनीं** उत्तम **अभिप्राय** दिल्याबद्दल त्यांचा फार आभारी आहें.

मंगळूर येथील सुप्रसिद्ध वयोवृद्ध, ज्ञानवृद्ध, परोपकारी **रा० रा० भारद्वाज सिवाराव,** मेडिकल प्रॅक्टिशनर, यांनीं आह्मांवर अप्रत्यक्षरीतीनें आपल्या **सद्बोधवचनांनीं** पत्रोत्तरीं पुत्रवत् प्रेमा वृद्धिंगत करून **"श्रीसंतसंघ"**प्रसाराच्या कार्यांत वेळोवेळ उत्तम सल्ला दिली, आणि स्वतःजवळ असलेले पुष्कळसे प्रसिद्ध **श्रीसंतांचे** फोटो आपल्या खर्चानें वरचेवर रजिष्टर करून पाठवून देऊन आपल्या **शीलाची** व **परोपकारी**पणाची उत्तम ओळख पटवून दिली, या त्यांच्या **सदय** कृतीबद्दल थोर आनंद वाटत आहे.

अकोला वऱ्हाड येथील **रा० रा० हरी रामचंद्र पिटके,** गोवा, फोंडा येथील **रा० रा० विश्वनाथराव सां० वालावलीकर,** व साष्ट पिंपळगांव येथील रा० रा० **गोविंद नारायण मुकीमे** या प्रेमळ **संतभक्तांनीं** आह्मांस प्रसिद्ध **श्रीसंतांचे** फोटो वगैरे पाठवून मुळापासून " **श्रीसंतसंघ** " प्रसाराच्या कार्यास निरपेक्षबुद्धीनें सहाय केलें याबद्दल त्यांचे आभार वाटतात.

मुंबईतील महानुभव **संतभक्त रा० रा० वासुदेवराव वामन ठाकूर बी. ए.** हे आह्मांस बंधुत्वाच्या नात्यानें परम प्रेमानें या कामीं उत्तम सल्ला देतात, याबद्दल त्यांचे आभार प्रदर्शित करणें माझें कर्तव्य होय. प्रस्तुतच्या " **श्रीसंतसंघपुस्तकमालेच्या** " कार्यांत बेळगांव येथील, **रा० रा० मंगेशराव भिकाजी गुंजीकर** रत्नागिरी येथील **डि० डे० कलेक्टर रा० विनायकराव भास्कर सांखवळकर.** धारवाड येथील **रा० रा० व्यंकटराव वैकुंठ वाघ सबजज्ज.** सुजालपुर **येथील रा० रा० अनंतराव केशव बक्षी.** सावरगांव येथील म. शा. हेडमास्तर **रा० रा० कृष्णा माधवराव ब्राह्मण.** हुबळी येथील **रा० रा० मंगेशराव सखाराम नेरुरकर.** वसई येथील **रा० रा० गणपतराव मुकुंद परुळकर वकील.**

गोवा येथील **रा० रा० श्रीधर केशव कामत** कुंडईकर व महाड येथील **रा० रा० बाळकृष्ण विठ्ठल टिपणीस** यां सज्जन गृहस्थांनीं तसदी घेऊन बरेच वर्गणीदार आह्मांस पाठविले, याबद्दल त्यांचा अत्यंत आभारी आहें.

मुंबईतील माझ्या समस्त **परमहितचिंतक भाविक मित्रांनीं** बरेच श्रम घेऊन पुष्कळ आश्रयदाते देऊन या कामीं उत्तेजन दिलें याबद्दल माझ्या **प्रियमित्रांचें प्रेमपूर्वक अभिनंदन करितों.**

प्रिय वाचकबंधु हो, " वाहते गंगेमाजी हात धुवुनि कां न घेसी " ही उक्ती हृदयांत आल्यानें

**माझ्या गरीब विद्यार्थीबंधूंकरितां,**

लौकिक लज्जा पार देशोधडीस लावून देऊन या देहप्रारब्धाच्या कर्मकहाणीचा थोडासा मासला येथें ठेवण्याची स्फूर्ति होत आहे !

वयाच्या पांचवे वर्षी माझ्या परम पूज्य व पवित्र तीर्थरूप "**जगन्नाथ**" पित्यानें व्रतबंध करून पुढें सहा महिन्यांनीं त्यांनीं ही आपली संसाररूपी महायात्रा आटपून **श्रीभगवंताच्या** चरणकमलीं स्वास्थ्य घेतलें ! तेव्हांपासून नैसर्गिक स्वभावानुसार पोरक्या स्थितींतील सत्यानुपथें अनुभव घेऊन कावून गेलों ! वयाचे विसावे वर्षी **श्रीप्रभुरायानें** योगायोगानें प्राप्त घडी आणल्यानें जन्मभूमी **सिवोली-गोवा**,सोडणें प्राप्त झालें व **भगवदिच्छेनें** मुंबईंत आलों. मुंबईत आल्यावर **भगवंतानें** योग आणल्यावरून सन१८९६ सालांत मुंबईतील **सर जमशेटजी जिजीभाई स्कूल ऑफ आर्टस्** या नांवाच्या **चित्रशाळेंत** दाखल झालों. कर्मयोगानें आकस्मिक आलेली त्या वेळची गरीब स्थिति, थोर खर्चाची आर्टस्सारखी विद्या बारा वर्षेपर्यंत प्राप्त करून घेण्याचा जबरदस्त निग्रह, या त्रिविध जनांतून अब्रू संभाळून रहाणेचा प्रयत्न, वगैरे वगैरे स्थितीचें अवलंबन करून बारा वर्षेपर्यंत विद्या प्राप्त करून घेणाऱ्या मजसारख्या गरीब विद्यार्थ्यास तितक्या दरम्यान कोणकोणत्या प्रकारच्या अडचणी, पदोपदीं मानहानी, वगैरे शोचनीय स्थिति भोगावी लागली असेल, याची कल्पना त्या स्थितींत बुडून राहणाऱ्या माझ्या गरीब विद्यार्थिबंधूंसच अनुभवदायक होईल, इतरांस त्याचें कःपदार्थ महत्व वाटेल !

"**निश्चयाचें बळ तुका ह्मणे तेंची फळ**" या **श्रीतुकाराम** महाराजांच्या अनुभवोक्तीला अनुसरून त्या चित्रशाळेंतील, सदाचारी, सच्छील, सद्गुणसंपन्न व सर्व **हिंदुस्थानभर नांवाजलेले सर जे० जे० स्कूल ऑफ आर्टस्चे** प्रस्तुतचे **हेडमास्तर चित्रकलापटु रा० रा० महादेवराव विश्वनाथ धुरंधर,** यांच्या आश्रयीं कांहीं वर्षे घालवून झालेल्या निश्चयाप्रमाणें व माझे **परम दयाळु धनवान्** आणि **गरीब** या **उदार परोपकारी गृहस्थांच्या** साहाय्यानें अभ्यास

झाला. त्या माझ्या बिकट प्रसंगीं ज्या **उदार गृहस्थांनीं** मला **हातभार** लावून शक्त्यनुसार **मदत** केली त्यांचे **अंतर्बाह्य आभार मानून परमेश्वराकडे** त्यांचें **अखंड कल्याण** इच्छितों.

श्रीयुत रा० रा० **मास्तर धुरंधर** यांनीं आपल्या नैसर्गिक सत्यवर्तनाला अनुसरून वर्गांत **समदृष्टी** ठेवून वागविल्याबद्दल त्यांचा आभारी आहें. अशा प्रकारचें वर्तन ठेवणें हें त्यांस या अमोल **नृजन्मांतील** अत्यंत भूषणास्पद होय. रा० रा० **मास्तर धुरंधर** यांनीं वर्गांत अशाच प्रकारें सदैव **वर्तन** ठेवून आपल्या **सद्वर्तनाचा लाभ** सर्व **विद्यार्थिबंधूंस** द्यावा ह्मणून प्रेमानें मागणी मागतों. असो, झालेल्या निश्चयाप्रमाणें अभ्यास झाला, व प्राक्तनानुसार अंगीं थोडी बहुत कला प्राप्त व्हावयाची तीहि झाली, आणि गरीब विद्यार्थ्यांस कोणत्या प्रकारें त्रास सहन करावे लागतात याचाहि पूर्ण अनुभव आला! प्राप्त झालेल्या कलेच्या आधारानें स्वतंत्रपणें धंदा करून संगतीच्या जीवांचें परिपालन करणेचा साभिमानपूर्वक निश्चय होता. परंतु, **"मनांत येतें हत्ती घोडे पालखींत बैसावें। देवाजीच्या मनांत याला पायिं चालवावें"** हा आपल्या जबरदस्त सत्तेचा पूर्ण अनुभव दाखविण्याकरितां, **प्रभुरायानें** त्या शिक्षणाच्या दरम्यान **महानुभवसूर्य श्रीसमर्थ वाग्देव महाराज,** यांच्या परम पावन **पददर्शनाचा** लाभ घडवून देऊन आजवर अखंड सान्निध्यांत नतविलें व श्री**समर्थांकडून** पदोपदीं महाथोर अनुभवांचा सांठा या मृदुहृदयकमलांतरीं प्रकाशित करून देऊन शेवटीं दिलेली आपली मनमोहक चित्रकला अजिबात हिरावून घेतली! व एवढी या मनाची खात्री करून सोडली कीं, **हें सर्व जग माझ्याच सत्तेनें चालत आहे, माझ्या इच्छेवांचून झाडाचें पान देखील हालत नाहीं.** जरी भूतमात्र साभिमानपूर्वक निश्चय धरून कोणतेंहि काम **मी** तडीस नेणार ह्मणून हट्ट धरील तर **माझ्या सत्तेपुढें** त्याच्या हट्टाचा व निश्चयाचा किंचित् मात्र उपयोग होणें कठीण! असा **परम दयाळु भगवंतानें** धडधडीत या मनास दाखला देऊन हातांत ब्रश घेऊन काम करणेची मनोवृत्ती नष्ट केली! व आपल्या इच्छेनुरूप शके १८३० सालीं मुंबईत **श्रीमत्कुलधर्मगुरु श्रीगोकर्णमठाधिपति श्रीमदिंदिराकांततीर्थस्वामी महाराज** यांच्या दर्शनाचा योग घडवून त्यांच्या सुमंगल हस्तानें **नारळ पुष्पप्रसाद देववून "रामसेवक चित्रालय** या नांवें **"श्रीसंतसंघ**प्रसाराच्या **संस्थेचें बीजारोपण** केलें!" तेव्हांपासून ह्या वेळपर्यंत **श्रीसंतसंघ**प्रसाराचा नाद अंतर्बाह्य लागून राहिला आहे! गरीब स्थितींतून पदोपदीं अनेक अडचणी सहन करून प्राप्त झालेली अल्पकला हालोहाल नष्ट होत आहे, याबद्दल किंचितसुद्धां दुःख होत नसून, उलट **भगवंताच्या** अगाध लीलेचा चमत्कार अंतर्दृष्टीनें विचार करीत बसलों ह्मणजे, हें हृदय सद्गदित होऊन डोळ्यावाटे टपाटप प्रेमाश्रु येतात! अहाहा!! **प्रभुराया!** तुझी लीला अनुपम आहे!

हे शोचनीय स्थितींतून दृढनिश्चयानें विद्या प्राप्त करूं घेऊं इच्छिणारे माझे प्रिय **गरीब विद्यार्थिबंधु** हो, त्या वेळच्या माझ्या प्रसंगाला अनुसरून निघालेले अनुभवोद्गार तुह्मांसमोर ठेविले आहेत ! प्रियबंधु हो, आपणांस गरीबस्थितींतून विद्या प्राप्त करून घेतेवेळीं मध्यें असंख्य विघ्नें येतील, **श्रीमंत व गरीबांचे द्वारीं तुह्मांस श्वानवत् केविलवाण्याप्रमाणें हात पसरून तिष्ठत उभें रहावें लागेल, पदोपदीं मानहानि होत जाईल,** व एखादे वेळीं **महादुर्धर प्राक्तनभोगानुसार मधुकरी मागून पोटापुरतें अन्न** मिळविण्याची पाळीसुद्धां तुह्मांवर येईल; परंतु, **हे दृढ निश्चयानें विद्या प्राप्त करूं इच्छिणारे माझे जिवलग विद्यार्थिबंधु हो,** ह्या अनेक विघ्नांस विचारानें पाठ देऊन, तुमच्या बलवत्तर **दृढनिश्चयाच्या जोरावर** धैर्यानें वाट चालून **निरहंकारयुक्त** विद्याभ्यास परिपूर्ण दशेस आणण्याचा नेटानें प्रयत्न चालवा; तुमच्या **प्रबल इच्छाशक्तीच्या** जोरावर **साक्षात् प्रभुराय** तुमचे साच मनोरथ पूर्ण करण्याकरितां **तुमच्या पाठीमागें उभे राहून** कार्य सिद्धीस नेतील व शेवटीं—"**क्रयविक्रयवेलायां काचः काचो मणिर्मणि** या उक्तीप्रमाणें होऊन या जगांत तुह्मी निःशंक **कीर्तिरूपानें** रहाल, याबद्दल सुद्धां पूर्वील अनेक उदाहरणें तुमच्या **दृढनिश्चयास पुष्टी देण्याकरितां** धडधडीत तुह्मांसमोर उभीं आहेत. कोणत्याहि बाबींत **दृढनिश्चयच फलद्रूप** होत असतो व त्या **मायबाप प्रभुरायानें दृढनिश्चयाचें फळ दिलेंच पाहिजे.** मात्र त्यांत **कर्तृत्वाभिमान अंशसुद्धां** असतां कामा नये, याकरितां तुह्मीं निरहंकारयुक्त विद्या प्राप्त करून घेण्याचा प्रयत्न करा आणि याप्रमाणें वागण्यास न विसरतां तुमच्या बिकटप्रसंगीं भगवत्प्रेरणेनें ज्या **उदार गृहस्थांनीं** तुह्मांस **मदत** केली त्यांचे अखंड **आभार** मानून लौकिकांतसुद्धां प्रसंगानुसार त्यांची कीर्ति गाण्यास विसरूं नका, आणि या स्थितींतून **प्रभुराय** जेव्हां तुह्मांस पार पाडून **ऐपत** देईल तेव्हां तुमच्या **पूर्वस्थितीवर** लक्ष्य देऊन शक्य तेवढी **गरीब विद्यार्थ्यांस मदत करा.** या कर्मास मात्र परावृत्त होऊन तुमच्या थोर कर्तव्यास कालिमा लावून घेऊं नका, ह्मणजे **परमात्मा** तुमचें वंशपरंपरा कल्याण करील, आज त्या स्थितीचा पूर्णानुभवें अवलंबन करण्याचा **प्रभुरायानें** योग आणून दिल्यामुळें व त्याचेच प्रेरणेनें हे अनुभवोद्गार आपल्यापुढें ठेवित आहें, ते आपणास सुखप्रद होवोत, व आपल्या दृढनिश्चयास दुजोरा देवोत अशी पूर्ण आशा धरून **भगवच्चरणीं** सर्वांचें अखंड कल्याण इच्छितों.

हे माझे समस्त हितचिंतक **भाविक बंधुहो,** **ही भगवंताच्या कृपेनें झालेली "श्रीसंतसंघपुस्तकमालेची"** पहिली कृती आपणास प्रियकर होऊन यापुढें **त्याच्याच कृपेनें** होणाऱ्या **दुसऱ्या भागास** आपणाकडून पूर्ववत् आश्रय इर्ले

परहस्तें मिळून या **श्रीसंतसंघपुस्तकमालेचा** सर्वत्र प्रसार होईल अशी पूर्ण आशा करितों.

"**श्रीसंतसंघपुस्तकमाला भाग २ रा**" यांत येणाऱ्या **श्रीसंतांचीं नांवें** शेवटीं प्रसिद्ध केलेलीं आहेत तीं वाचण्याबद्दल विनंती करितों.

आमचे प्रिय मास्तर रा० रा० **महादेवराव विश्वनाथ धुरंधर** यांनीं आह्मांस मुंबईतील प्रसिद्ध "**लक्ष्मीआर्टप्रिन्टिंगवर्क्सचे**" मालक **श्रीमंत रा० रा० पुरुषोत्तम विश्राम मावजी** यांची ओळख करून दिली याबद्दल त्यांचा आभारी आहें. **श्री० रा० रा० पुरुषोत्तमजी** यांनीं आपल्या सुंदर "**लक्ष्मीआर्ट प्रिंटिंग वर्क्स**" मधून या पुस्तकाचें सर्व प्रकारें ( बाइंडिंगसुद्धां ) उत्तम रीतीनें काम करून देऊन आनंदित केल्याबद्दल त्यांचा थोर आभारी आहें.

शेवटीं हे **प्रभो!** आपण ज्याप्रमाणें या तुझ्या अज्ञान बालकास बुद्धि दिली त्याप्रमाणें आज ही कृती घडली आहे! यापुढें बुद्धिदाता **तूंच समर्थ** आहेस! **तूं** दिलेल्या बुद्धीनें हे वेडेवाकडे प्रेमोद्गार माझ्या भाविक बंधूंपुढें ठेवले आहेत; त्यांचा ते प्रेमानें आदर करून अपराध पोटांत घालतील अशी अंतरापासून आशा धरून माझ्या समस्त हितचिंतक **भाविक बंधूंस "श्रीसंतसंघपुस्तकमालेच्या"** दर्शनानें अखंड समाधान होवो, ह्मणून **भगवच्चरणीं** नम्रभावानें प्रार्थना करितों.

**रामसेवक चित्रालय,**
मुंबई आश्विन शु॥१दा.
शके १८३४.

समस्त भाविक बंधूंचा नम्र बंधु
**कृष्ण जगन्नाथ थळी.**

## ॥ पद ॥

**रामा स्वरुपिं चित्तवृत्ति वळवीं वळवीं ॥ ध्रु० ॥ गळवुनि हंकृति कळविं स्वसुख मज । मळविं संसारदुःख टळवीं हळवी ॥ रा० ॥ १ ॥ होऊनी विषयीं तळमळत मानस । कळवळुनी दुरितें सारीं पळवीं पळवीं ॥ रा० ॥ २ ॥ चपळपण मनाचें सकल हरुनि । विष्णुकृष्णजगन्नाथ पदिं मिळवीं मिळवीं ॥ रा० ॥ ३ ॥ "श्री बांदकर."**

**॥ जय जय रघुवीर समर्थ ॥**

---

# श्रीसंतसंघपुस्तकमाला भाग दुसरा.

या दुसऱ्या भागांत खालील **श्रीसंतांचे** चेहेरे येतील. प्रत्येक फोटोच्या खालीं श्रीनामदेव महाराजांचा श्रीसंतपर अभंग येऊन पुढें भक्तिज्ञानवैराग्यपर पदसंग्रह (पहिल्या भागांत न आलेला) येईल. किं० आगाऊ ग्राहकांस फक्त एक रुपया, मागाहून दीड रुपया होईल. समस्त भाविक बंधू दुर्मिळ संधी न दवडतील अशी पूर्ण उमेद आहे.

## श्रीसंतांचीं नांवें.

१ श्रीमाणिकप्रभु, म० हुमनाबाद.
२ श्रीशीलनाथ, म० ग्वाल्हेर.
३ श्रीगंगाधरनाथ, ढोले, ग्वाल्हेर.
४ श्रीदेवीदानजी, म० जोतपूर.
५ श्रीजीवन्मुक्त, म० उरण.
६ श्रीमुकुंदराज बांदकर, म० गोवा.
७ श्रीताजुद्दीन, म० नागपूर.
८ श्रीअंत्रीकर, म० अंत्री.
९ श्रीमुरगींद्र, म० आथणी.
१० श्रीहनुमानदास, म० प्रयाग.
११ श्रीगौरिनाथ, म०श्रीशैल, अमदाबाद.
१२ श्रीझोलानेवाले, म० ग्वाल्हेर.
१३ श्रीगंगागिरी, म० पुणतांबें.
१४ श्रीअरुणाचलेश्वर, म० अरुणाचल.
१५ श्रीशिवनेरकर, म० शिवनेर.
१६ श्रीदादा पराडकर, म० पराडी.
१७ श्रीनारायण(गोरक्षनाथ)देव कारंजा.
१८ श्रीसितारामबुवा, म० इंदूर, माळवा.
१९ श्रीमार्तंड, म० ग्वाल्हेर.
२० श्रीनाडकर्णी म० वेंगुर्लें.
२१ श्रीआनंदसागर, जालना.
२२ श्रीकबीरदास, म० हुबळी.
२३ श्रीजानकीदास, म० सुरत,
२४ श्रीबाळकृष्ण, म० सुरत.
२५ श्रीनित्यानंद म० मद्रास.
२६ श्रीचिंतामणि, म० वेडूळ.
२७ श्रीकेजाजी, म० सेलूघोराड, वर्धा.
२८ श्रीमुंगशी, म० धामणगांव.
२९ श्रीशंकर, म० एलीचपूर.
३० श्रीसंतरामदादा, म. अक्कलकोट.
३१ श्रीब्रह्मानंद, म० बेलधडी.
३२ श्रीलाला, म० दारव्हा.
३३ श्रीरामजी बोवा, म० मोरसी.
३४ श्रीरावजी बोवा, मुंबई.
३५ श्रीरामचंद्र, म० वहाळ.
३६ श्रीराममारुती, म० मुंबई व भिवंडी.
३७ श्रीकाशिनाथ, म० बुरबाड.
३८ श्रीजनार्दन, म० बडोदें.
३९ श्रीमाधवनाथ, म० चित्रकूट.
४० श्रीमहादेव प्रभु म० जांब, वाई.
४१ श्रीतुकाराम, म० अमळनेर.
४२ श्रीयोगानंद, म० कलकत्ता.
४३ श्रीशिवहरण, म० तुळजापूर.
४४ श्रीगुलाबराव, म० उमरावती.
४५ श्रीलक्ष्मण वैरागी, वैराग.
४६ श्रीखुशीराम, म० मुंबई.
४७ श्रीबळवंतबाबा सातारकर, मुंबई.
४८ श्रीमहादुदेव, पलूस.
४९ श्रीचौंडी, म० काशी.
५० श्रीबाळाबोवा, थळ, व मुंबई.

# स्वात्मतत्वामृतशतक.

**गोमांतक**—डोंगरी येथील प्रसिद्ध साधुवर्य ब्रह्मीभूत श्रीकृष्ण महाराज बांदकर यांनीं १०१ श्लोकांचा वरील नावांचा गहन विषयावर सोप्या व सरळ भाषेनें ग्रंथ रचिला आहे. यांत १०१ श्लोक असून आणखी ३८ पदें व (१) श्री राघवाष्टक (२) पतितपावन रामश्लोकाष्टक (३) जानकीजीवनराममंत्रार्याष्टक (४) राजीवनयनराम श्लोकाष्टक (५) आनंद घनराम मंत्रार्या व (६) श्री सीताराम मंत्र श्लोक अशा पूर्ण प्रेमरसानें ओथंबलेल्या कविता घातल्या आहेत. मुख्य १०१ श्लोक वेदांतपर असून ते मुमुक्षु साधकांस आपल्या साधनमार्गास अत्यंत मदत करणारे आहेत. अनुभव घेणें मुमुक्षूंच्या हातीं आहे. किं. ६ आणे, शि. पोष्टखर्च. एकदम चार प्रति मागविल्यास पोष्टखर्च पडणार नाहीं.

## नमुन्यासाठीं खालील श्लोक वाचावे.

मी हा शब्द उठे जिथें स्वरुप तें, सच्चित्सुखात्मा तुझें ॥
देहादी जड विश्व ज्यामधिं स्फुरे तो तूं स्वयें ना दुजें ॥
आहे आपण मीपणारहित हे लक्षीं मुळींची खुणा ॥
दृश्यादृश्य गिळोनि तन्मयपणें हो तूं तुझा देखणा ॥ ४७ ॥

निद्रेमाजि जसा निवृत्ति अससी जागेपणीं हो तसा ॥
आनंदांत मुरोनि विस्मृति न घे रक्षी सुखात्मा ठसा ॥
जें जें पाहसि तें सुखात्मक असे येईल लक्षीं तुला ॥
तूं आनंदसमुद्र विश्व लहरी जाणोनि घोटीं मुला ॥ ४८ ॥

आहे कोण सदैव हेंचि विवरी कीं दृश्य त्या देखणा ॥
नाहीं त्या अवलोकिं कोण धरि त्या आहेपणाची खुणा ॥
निद्रा जागृति स्वप्न यासि वळखे नाशे न त्यांच्या सम ॥
आहे आपण पूर्ण व्यापकपणें लक्षूनि टाकी भ्रम ॥ ४९ ॥

पु० मि० ठि०—रामसेवक चित्रालय, मुंबई नं० ४.

## अभंग.

पवित्र तें कुळ, पावन तो देश । जेथें हरिचे दास, घेती जन्म ॥ १ ॥
कर्म धर्म त्याचे, जाला नारायण । त्याचेनि पावन, तिन्ही लोक ॥ २ ॥
वर्णअभिमानें, कोण जाले पावन । ऐसें द्या सांगून, मजलागीं ॥ ३ ॥
अंत्यजादियोनि, तरल्या हरिभजनें । तयांचीं पुराणें, भाट जालीं ॥ ४ ॥
वैश्य तुळाधार, गोरा तो कुंभार । धागा हा चांभार, रोहिदास ॥ ५ ॥
कबीर मोमिन, लतिफ मुसलमान । सेना न्हावी जाण, विष्णुदास ॥ ६ ॥
कान्होपात्र खोदु, पिंजारी तो दादु । भजनीं अभेदू हरिचे पायीं ॥ ७ ॥
चोखा मेळा वंका, जातीचा महार । त्यासी सर्वेश्वर, ऐक्य करी ॥ ८ ॥
नामयाची जनी, कोण तिचा भाव । जेवी पंढरीराव, तियेसवें ॥ ९ ॥
मैराळ जनक, कोण कुळ त्याचें । महिमान तयाचें, काय सांगों ॥ १० ॥
यातायाती धर्म, नाहीं विष्णुदासा । निर्णय हा ऐसा वेदशास्त्रीं ॥ ११ ॥
तुका ह्मणे तुह्मीं, विचारावे ग्रंथ । तारिले पतित, नेणों किती ॥ १२ ॥

"श्रीतुकाराम."

## ओव्या.

प्रतिमा माझ्या अचेतन व्यक्ति । संत सचेतन माझ्या मूर्ति ॥
दृढ भावें केल्या त्यांची भक्ति । ते मज निश्चितीं पावती ॥ १ ॥
सकळ तीर्थीं तोचि न्हाला । जपतपाचें फळ तोचि लाधला ॥
सर्व पूजांचें सार पावला । जेणें साधु वंदिला सन्मानें ॥ २ ॥
प्रतिमा निज कल्पना उत्तम । संत प्रत्यक्ष पुरुषोत्तम ॥
चालतें बोलतें परब्रह्म । अति उत्तम साधुसेवा ॥ ३ ॥
सांडूनि लौकिकाच्या लाजा । जो वैष्णवांचा रेणुरजा ॥
गडबडां लोळे वोजा । हा भक्तीचा माझा उल्हास ॥ ४ ॥

"ए. भागवत अ० ११ वा."

## अभंग.

संतांचिया पुढें, होईन खेळता । वचन बोलता ऐसें करीं ॥ १ ॥
संत मज देवा, धरिती पोटाशीं । ऐसें हृषीकेशी, करीं मज ॥ २ ॥
संत मज देवा, ह्मणतिल आपुला । ऐसें घननीळा, करीं मज ॥ ३ ॥
संत मजलागीं, करिती ब्रह्मबोध । ऐसा ब्रह्मानंद, करीं मज ॥ ४ ॥
संतांलागीं माझा, असो अभिमान । ह्मणे नारायण निरंजन ॥ ५ ॥

"नारायण निरंजन."

---

या पुस्तकाचीं १ तीं ८ व ५९ तीं ८६ हीं पृष्ठें "निर्णयसागर छापखान्यांत" छापिलीं आहेत.



श्री कृष्णबांदकर म० गोवा. ( ब्रह्मीभूत. )

Shri Krishna Bandker. Goa. ( Late. )

कृष्ण माझी माता कृष्ण माझा पिता । बहिणी बंधु चुलता कृष्ण माझा ॥ १ ॥ कृष्ण माझा गुरु कृष्ण माझें तारूं । उतरी पैलपारु भव नदी ॥ २ ॥ कृष्ण माझें मन कृष्ण माझें जन । सोईरा सज्जन कृष्ण माझा ॥ ३ ॥ तुका ह्मणे माझा श्रीकृष्ण विसावा । वाटे न करावा परता जीवा ॥ ४ ॥



**श्री वाग्देव म० मुंबई व वठार** ( विद्यमान. )

Shri Vagdev, Bombay. (Wathar.) [Alive.]

काय सांगों आतां संतांचे उपकार । मज निरंतर जागविती ॥ १ ॥ काय द्यावें त्यांचें व्हावें उतराई । ठेवितां हा पायीं जीव थोडा ॥ २ ॥ सहज बोलणें हित उपदेश । करूनि सायास शिकविती ॥३॥ तुका ह्मणे वत्स धेनुवेंचा चित्तीं । तैसे मज येती सांभाळीत ॥ ४ ॥



**श्री रघुनाथ म०, धोपेश्वर.** ( ब्रह्मीभूत )

Shri Raghunath, Dhapeshwar. ( Late )

काय वाणूं आतां न पुरे हे वाणी । मस्तक चरणीं ठेवीतसें ॥१॥ थोरीव सांडिली आपुलीं पारिसें । नेणें शिवों कैसें लोखंडासी ॥२॥ जगाच्या कल्याणा संतांच्या विभूति । देह कष्टविती उपकारें ॥३॥ भूतांची दया हे भांडवल संतां । आपली ममता नाहीं देहीं ॥४॥ तुका म्हणे सुख पराविया सुखें । अमृत हें मुखें स्रवतसे ॥५॥



**श्री अक्कलकोटचे स्वामी,** ( ब्रह्मीभूत )

Shri Akkalkote Swami. ( Late )

लेंकराचें हित । वाहे माउलीचें चित्त ॥ १ ॥
ऐसी कळवळ्याची जाती । करी लाभेंविण प्रीती ॥२॥
पोटीं भार वाहे । त्याचें सर्वस्वही साहे ॥३॥
तुका ह्मणे माझें । तैसें तुह्मां संतां ओझें ॥४॥



**श्री सिद्धारूढ म० हुबळी.** ( विद्यमान. )

Shri Sidharooda, Hubli. ( Alive.)

संतांच्या पादुका घेईन मोचे खांदीं । हातीं टाळ दिंडी नाचेन पुढें ॥१॥ भजनविधी नेणें साधन उपाय । सकळ सिद्धि पाय हरिदासांचे॥२॥ध्यानगति मति आसन समाधि । हरिनाम गोविंदीं प्रेम सुख ॥३॥ नेणता निर्लज्ज नेणें नाद भेद । सुखें हा गोविंद गाऊं गीतीं ॥४॥ सर्व जोडी मज गोत आणि वित्त । तुका ह्मणे संतमहंतपाय ॥५॥



**श्री गोपालदास म०, नासीक.** ( विद्यमान. )

Shri Gopaldas, Nasik. ( Alive )

कृपाळू सज्जन तुह्मी संतजन । हेंचि कृपादान तुमचें मज ॥१॥ आठवण तुह्मी द्यावी पांडुरंगा । कींव माझी सांगा काकुलती ॥२॥ अनाथ अपराधी पतिता आगळा । परि पायां-वेगळा नका करूं ॥३॥ तुका ह्मणे तुह्मी निरविल्यावरी । मग मज हरि उपेक्षीना ॥४॥



**श्री रामकृष्ण परमहंस म०, कलकत्ता.** ( ब्रह्मीभूत )

Ramkrishna P. Calcutta. ( Late )

पाप ताप दैन्य जाय उठाउठी । जालिया भेटि हरिदासांची ॥१॥ ऐसें बळ नाहीं आणिकांचे अंगीं । तपें तीर्थें जगीं दानें व्रतें ॥२॥ चरणीचें रज वंदी शूळपाणी । नाचती कीर्तनीं त्यांचे माथा ॥३ भव तरावया उत्तम हे नाव । भिजों नेदी पाव हात कांहीं ॥४॥ तुका ह्मणे मन जालें समाधान । देखिले चरण वैष्णवांचे ॥४॥



**श्री विवेकानंद म०, कलकत्ता.** ( ब्रह्मीभूत )
Shri Vivekananda, Calcutta. ( Late )

संतांचिया पायीं माझा विश्वास । सर्वभावें दास जालों त्यांचा ॥१॥ तेचि माझें हित करिती सकळ । जेणें हा गोपाळ कृपाकरी ॥२॥ भागलिया मज वाहतील कडे । त्यांचियानें जोडे सर्व सुख ॥३॥ तुका ह्मणे शेष घेईन आवडी । वचन न मोडी बोलिलों तें ॥४॥



**श्री भास्करानंद सरस्वति म०, काशी.** ( ब्रह्मीभूत )

Shri Bhaskaranand, Benares. ( Late )

नाहीं संतपण मिळत हें हाटीं । हिंडतां कपाटीं रानींवनीं ॥१॥ नये मोल देतां धनाचिया राशी । नाहीं तें आकाशीं पाताळीं तें ॥२॥ तुका ह्मणे मिळे जिवाचिये साटीं । नाहीं तरी गोष्टी बोलों नये ॥३॥



**श्री नृसिंहसरस्वति म० आळंदी. ( ब्रह्मीभूत. )**

Shri Narasinha, Alandi. ( Late, )

संतचरणरज लागतां सहज । वासनेचें बीज जळोन जाय ॥१॥ मग रामनामीं उपजे आवडी । सुख घडो-घडी वाढों लागे ॥२॥ कंठीं प्रेम दाटे नयनीं नीर लोटे । हृदयीं प्रगटे रामरूप ॥३॥ तुका ह्मणे साधन सुलभ गोमटें । परि उपतिष्टे पूर्व पुण्यें ॥ ४ ॥



**श्री धोंडी म०, पलूस.** ( ब्रह्मीभूत )

Shri Dhondi, Palus. ( Late )

संतपाउलें साजिरीं । गंगा आली अह्मांवरी ॥ १ ॥ जेथें पडे रजधुळी । तेथें करावी अंघोळी ॥ २ ॥ सेतुबंध वाराणसी । अवघीं तीर्थें तयांपासीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे धन्य जालों । संतसागरीं मिळालों ॥ ४ ॥



श्री कृष्ण म० कोल्हापूर. ( ब्रह्मीभूत )

Shri Krishna, Kolhapur. ( Late )

कृपेचे सागर होचि साधुजन । तिहीं कृपादान केलें मज ॥ १ ॥ बोबडे वाणीचा केला अंगीकार । तेणें माझा स्थिर केला जीव ॥ २ ॥ तेणें सुखें मन स्थिर जालें ठायीं । संतीं दिला पायीं ठाव मज ॥ ३ ॥ नामी नामी ऐसें बोलिले वचन । तें माझें कल्याण सर्वस्वही ॥ ४ ॥ तुका ह्मणे जालों आनंद निर्भर । नाम निरंतर घोष करूं ॥ ५ ॥



**श्री नारायण म०, चांदोरी.** ( ब्रह्मीभूत )

Shri Narayan, Chandori. ( Late )

पुण्यवंत व्हावें । घेतां सज्जनांचीं नांवें ॥१॥
ने घे माझें वाचे तुटी । महालाभ पुकासाठीं ॥१॥
विश्रांतीचा ठाव । पायीं संतांचिया भाव ॥३॥
तुका ह्मणे पापें । जाती संताचिया जपें ॥४॥



**श्री गजानन म०, शेगांव.** ( ब्रह्मीभूत )

Shri Gajanan Shegam. ( Late )

जाणे भक्तीचा जिव्हाळा । तोचि देवाचा पुतळा ॥१॥
आणिक न ये माझ्या मना । हो का पंडित शाहणा ॥२॥
नामरूपीं जडलें चित्त । त्याचा दास मी अंकित ॥३॥
तुका ह्मणे नवविध । भक्ति जाणे तोचि शुद्ध ॥४॥



**श्री निर्मलदास म० सुरत.** ( ब्रह्मीभूत )

Shri Nirmaldas, Surat. ( Late. )

संतांचे घरींचा दास मी कामारी । दारीं परोवरी लोळ-
तसें ॥ १ ॥ चरणींचे रज लागती अंगास । तेणें बेताळिस
उद्धरती ॥ २ ॥ उच्छिष्ट हें जमा करूनि पत्रावळी ।
घालीन कवळी मुखामाजी ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज आणीक
विचार । नेणें हेंचि सार मानीतसें ॥ ४ ॥



**श्री सीताराम म०, मंगळवेढें.** ( ब्रह्मीभूत. )

Shri Sitaram, Pandharpur ( Late )

शुद्धबीजा पोटीं । फळें रसाळ गोमटीं ॥१॥

मुखीं अमृताची वाणी । देह देवाचे कारणीं ॥२॥

सर्वांगीं निर्मळ । चित्त जैसें गंगाजळ ॥३॥

तुका ह्मणे जाती । ताप दर्शनें विश्रांती ॥४॥



**श्री लक्ष्मण म०, वाकरी.** ( ब्रह्मीभूत. )

Shri Laxuman, Vakri. ( Late. )

संत आले घरा । तों मी अभागी दातारा ॥ १ ॥
कासयानें पूजा करूं । चरण हृदयींच धरूं ॥ २ ॥
काया कुरवंडी । करुन ओंवाळून सांडी ॥ ३ ॥
तुका ह्मणे भावें । हात जोडीं असो ठावें ॥ ४ ॥



**श्री सूर्याजी म०, राजापूर.** ( ब्रह्मीभूत )

Shri Suryaji, Rajapur. ( Late )

ऐकाजी संतजन । सादर मन करूनि ॥ १ ॥
सकळांचें सार एक । कंटक ते त्यजावे ॥ २ ॥
विशेषता कांद्याहूनी । सेवि त्या घाणी आगळी ॥ ३ ॥
तुका ह्मणें ज्याची जोडी । ते परवडी बैसीजे ॥ ४ ॥



**श्री वसुंधानंद म०, काशी. ( ब्रह्मीभूत. )**

Shri Vasudhanand, Kashi. ( Late )

भक्तां समागमें सर्वभावें हरी । सर्व काम करी न सांगतां ॥१॥ सांटवला राहे हृदय संपुष्टीं । बाहेर धाकुटी मूर्ति उभी ॥२॥ मागण्यांची वास पाहे मुखाकडे । चिंतिल्या रोकडे मनोरथ ॥३॥ तुका ह्मणे जीव भाव देवापायीं । ठेवूनि ते कांहीं न मागती ॥ ४ ॥



**श्री परमानंद म० काशी.** ( ब्रह्मीभूत )

Shri Parmanand, Kashi. ( Late )

संतसमागम एखादिया परी । राहावें त्याचे द्वारीं श्वानयाती ॥१॥ तेथें रामनाम होईल श्रवण । घडेल भोजन उच्छिष्टाचें ॥२॥ कामारी बटीक सेवेचे सेवक। दीनपण रंक तेथें भलें ॥३॥ तुका म्हणे सर्व सुख त्या संगती। घडेल पंगती संतांचिया ॥४॥



**श्री ब्रह्मचैतन्य गोंदवलेकर म०,** ( विद्यमान. )

Shri Gondawlaker, Gondavla, ( Alive.)

संत गाती हरिकीर्तनीं । त्यांचें घेइन पायवणी ॥१॥
हेंचि तप तीर्थ माझें । आणीक मी नेणें दुजें ॥२॥
काया कुरवंडी करीन । संत महंत ओवाळीन ॥३॥
संत महंत माझी पूजा । अनुभाव नाहीं दुजा ॥४॥
तुका ह्मणे नेणें कांहीं । अवघें आहे संतांपायीं ॥५॥



**श्री बाळकृष्ण म०, औरंगाबाद.** ( ब्रह्मीभूत )

Shri Balkrishna, Aurangabad. ( Late )

भावें गावें गीत । शुद्ध करूनियां चित्त ॥ १ ॥ तुज व्हावा आहे देव । तरि हा सुलभ उपाव ॥२॥ आणिकांचे कानीं । गुण दोष मना नाणीं ॥३॥ मस्तक ठेंगणा । करीं संतांच्या चरणा ॥४॥ वेंची तें वचन । जेणें राहे समाधान ॥ ५ ॥ तुका ह्मणे फार । थोडा तरी परउपकार ॥६॥



**श्री बोरीकर म० गोमंतक** ( ब्रह्मीभूत. )

Shri Boriker, Goa. ( Late )

वैराग्याचें भाग्य । संतसंग हाचि लाभ ॥ १ ॥
संत कृपेचे हे दीप । करी साधका निष्पाप ॥२॥
तोचि देव भक्त । भेदाभेद नाहीं ज्यांत ॥ ३ ॥
तुका प्रेमें नाचे गाये । गाणियांत विरोन जाये ॥४॥



**श्री हयग्रीव म०, चांदा.** ( ब्रह्मीभूत )

Shri Hayagriv, Chanda. ( Late )

काय माझी संत पाहती जाणीव । सर्व माझा भाव त्याचे पायीं ॥१॥ कारण सरतें करा पांडुरंगीं । भूषणाची जगीं काय चाड ॥२॥ बोबड्या उत्तरीं ह्मणें हरिहरि । आणीक भीकारी नेणें दुजें ॥३॥ तुका ह्मणे तुम्ही विठ्ठलाचे दास । करितों मी आस उच्छिष्टाची ॥४॥



श्री रंगनाथ म०, जालना. ( विद्यमान )

Shri Ranganath, Jalna. (Alive)

तुह्मी संत मायबाप कृपावंत । काय मी पतित कीर्ती वाणूं॥ १ ॥
अवतार तुह्मां धराया कारण । उद्धरावे जन जड जीव ॥ २ ॥
वाढविलें सुख भक्तिभाव धर्म । कुळाचार नाम विठोबाचें ॥ ३ ॥
तुका म्हणे गुण चंदनाचे अंगीं । तैसे तुम्हीं जगीं संतजन ॥ ४ ॥



श्री विद्यानंद म० बेलापूर. ( ब्रह्मीभूत )

Shri Vidyanand, Belapur. ( Late )

हरिदासाचिये घरीं । मज उपजवा जन्मांतरीं ॥ १ ॥
ह्मणसी कांहीं मागा । हेंचि देगा पांडुरंगा ॥ २ ॥
संतां लोटांगणीं । जातां लाजों नको मनीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे अंगीं । शक्ती देई नाचें रंगीं ॥ ४ ॥



**श्री पद्मनाभ स्वामी म० कारवार. बाड मठ** ( ब्रह्मीभूत )

Shr Padmanabh, Karavar Bad muth. ( Late )

श्रीसंतांचिया माथा चरणांवरी । साष्टांग हें करीं दंडवत ॥ विश्रांती पावलों संभाळउत्तरीं । वाढलें अंतरीं प्रेमसुख ॥२॥ डौरली हे काया कृपेच्या वोरसें । नव्हे अनारिसें उद्धरलों ॥३॥ तुका ह्मणे मज न घडतां सेवा । पूर्व पुण्य ठेवा ओडवला ॥ ४ ॥



**श्री ठाकूर हरनाथ म०, बंगाल** ( ब्रह्मीभूत )

Shri Thakur Harnath, Bengal ( Late )

हेंचि दान देगा देवा । तुझा विसर न व्हावा ॥१॥
गुण गाईन आवडी । हेंचि माझी सर्व जोडी ॥२॥
नलगे मुक्ति धन संपदा । संतसंग देईं सदा ॥३॥
तुका ह्मणे गर्भवासीं । सुखें घालावें आह्मासीं ॥४॥



**श्री रामतीर्थ म०, पंजाब.** ( ब्रह्मीभूत )

Shri Ramtirtha, Panjab. ( Late )

संतांचा महिमा तो बहु दुर्गम । शाब्दिकांचें काम नाहीं येथें ॥१॥ बहु धड जरी जाली म्हैस गाय । तरी होईल काय काम धेनु ॥२॥ तुका ह्मणे अंगें व्हावें तें आपण । तरीच महिमान येईल कळों ॥३॥



**श्री बाबा संतराम, अजमीर.** ( ब्रह्मीभूत. )

Shri Baba Santaram, Ajmer. ( Late. )

संत मारगीं चालती । त्याची लागो मज माती ॥ १
काय करावीं साधनें । काय नव्हे एक तेणें ॥ २ ॥
शेष घेईन उच्छिष्ट । धाय धणींवरी पोट ॥ ३ ॥
तुका ह्मणे संतांपायीं । जीव ठेविला निश्चयीं ॥ ४ ॥



**श्री अगम्यगुरू म०, हिमालय.** ( विद्यमान )
Shri Agamya Guru, Himalaya ( Alive )

पुनीत केलें विष्णुदासीं । संगें आपुलिया दोषीं ॥ १ ॥ कोण पाहे तयांकडे । वीर विठ्ठलाचे गाढे ॥ २ ॥ अशुभ त्यां पुढें । शुभ होऊनियां ठाके ॥ ३ ॥ प्रेम सुखाचिया रासी । पाप नाहीं ओखदासी ॥ ४ ॥ तुका ह्मणे त्यांनीं । केली वैकुंठ मेदिनी ॥ ५ ॥



श्री वैजनाथ ऊर्फ मौने म०, बंगाल. ( विद्यमान )

Shri Vaijanath, Bengal. ( Alive )

तरीच संत ह्मणावे । नेणे आपुलें परावें ॥ १ ॥
भूतमात्रीं हरीवीण । न पाहेचि दुजे पण ॥ २ ॥
प्रेम अंतरीं निःसीम । मुखीं ज्याचे रामनाम ॥ ३ ॥
तुका ह्मणे देहभाव । संतीं सोडियेला गांव ॥ ४ ॥



श्री मंगलागिरी म०, जोशी म० ( ब्रह्मीभूत )

Shri Mangalagiri, Joshi muth. ( Late )

आह्मां विष्णुदासां हेंचि भांडवल । अवघा विठ्ठल धन वित्त ॥१॥ वाणी नाहीं ध्यावें आपुलिया हातें । करोनियां चित्तें समाधान ॥ २ ॥ तुका ह्मणे द्रव्य मेळविलें मागें । हें तों कोणासंगे आलें नाहीं ॥ ३ ॥



**श्री शिवरामस्वामी, बंकापुर.** ( विद्यमान.)

Shri Shivram, Bunkapur ( Alive ) [S. C.]

आजी बरवें जालें । माझें माहेर भेटलें ॥ १ ॥
डोळां देखिले सज्जन । निवारला भागशीण ॥ २ ॥
धन्य जालों आतां । क्षेम देऊनियां संता ॥ ३ ॥
इच्छेचें पावलो । तुका ह्मणे धन्य जालों ॥ ४ ॥



श्री शालिग्रामजी, दिल्ली. ( ब्रह्मीभूत )

Shri Shaligramjee, Delhi. ( Late )

आतां तुह्मी कृपावंत । साधुसंत जिवलग ॥ १ ॥
गोमटें तें करा माझें । भार ओझें तुह्मांसी ॥ २ ॥
वंचिलें ते पायांपाशीं । नाहीं यासी वेगळें ॥ ३ ॥
तुका ह्मणे सोडिल्या गांठी । दिली मिठी पायांसीं॥४॥



श्री राधास्वामीजी दिल्ली. ( ब्रह्मीभूत. )

Shri Radha Swamijee, Delhi. ( Late )

संतसंगें याचा वास सर्वकाळ । संचला सकळ मूर्तिमंत ॥ १ ॥ घालूनियां काळ अवघा बाहेरी । त्यासीच अंतरीं वास दिला ॥ २ ॥ आपुलेंसें जिहीं नाहीं उरों दिलें । चोजवितां भलें ऐसीं स्थळें ॥ ३ ॥ तुका म्हणे नाहीं झांकत परिमळ । चंदनाचें स्थळ चंदनाचि ॥ ४ ॥



**श्री राधाकृष्ण चरणदास, नडिया०** ( ब्रह्मीभूत. )

Shri Badoo Bawajee, Nadia. ( Late )

संतांचे उपदेश आमुचे मस्तकीं । नाहीं मृत्युलोकीं राहा-
णेसा ॥ १ ॥ ह्मणऊनि बहु तळमळी चित्त । येईं वो
धांवत पांडुरंगे ॥ २ ॥ उपजली चिंता लागला उशीर ।
होत नाहीं धीर निढळ वाटे ॥ ३ ॥ तुका ह्मणे पोटीं
रिघालेंसे भय । करूं आतां काय ऐसें जालें ॥ ४ ॥



श्री बी. कृष्णराव, पट्टूर. ( विद्यमान )

Shri B. Krishnarav, Puttur. ( Alive )

देव वसे चित्तीं । त्याची घडावी संगती ॥ १ ॥
ऐसें आवडतें मना । देवा पुरवावी वासना ॥ २ ॥
हरिजनासी भेटी । नहो अंग संगें तुटी ॥ ३ ॥
तुका ह्मणे जिणें । भलें संतसंघष्टणें ॥ ४ ॥



श्री रोविंदास म० पिलीव. (विद्यमान)
Shri Rovindas, Piliv. ( Alive )

भाविकां हें वर्म सांपडलें निकें । सेविती कवतुकें धणी-
वरि ॥ १ ॥ इच्छितील तैसा नाचे त्यांचे छंदें । वंदिती
तीं पदें सकुमारें ॥ २ ॥ विसरले मुक्ती भक्ति अभिळासें ।
ओढत सरिसें सुख आलें ॥ ३ ॥ तुका ह्मणे नाहीं
मागायाची आस । पांडुरंग त्यांस विसंबेना ॥ ४ ॥



श्री अवधूत म०, पेठ हरसूल. ( विद्यमान. )

Shri Avadhoot, Peth Harsul. ( Alive. )

आले संत पाय ठेविती मस्तकीं । इहीं उभयलोकीं सरता केलों ॥१॥ वंदीन पाउलें लोळेन चरणीं । आजि इच्छा धणी फिटईल ॥ २ ॥ अवघीं पुर्वपुण्यें जालीं सानुकूळ । अवघेंचि मंगळ संतभेटी ॥४॥ तुका ह्मणे कृतकृत्य जालों देवा । नेणें परि सेवा डोळां देखें ॥४॥



**श्री नारायण म०, केडगांव.** ( विद्यमान. )
Shri Narayan, Kedgaon. ( Alive. )

युक्ति तंव जाल्या कुंठित सकळा । उरली हे कळा जीवनाची ॥१॥ संतचरणीं भावें ठेविलें मस्तक । जोडानि हस्तक राहिलोंसे ॥२॥ जाणपणें नेणें कांहींचि प्रकार । साक्षीतें अंतर अंतरासी ॥३॥ तुका ह्मणे तुह्मीं केलें अभयदान । तेणें समाधान राहिलेंसे ॥४॥



श्री पांडुरंग म०, मुरगोड. ( विद्यमान )
Shri Pandurang, Murgod. ( Alive )

अवघा भार वाटे देवा । संतसेवा न घडतां ॥ १ ॥
कसोटी हे असे हातीं । सत्य भूतीं भगवंत ॥ २ ॥
चुकलोंसा दिसे पंथ । गेले संत तो ऐसा ॥ ३ ॥
तुका ह्मणे सोंग वांयां । कारण या अनुभवें ॥४॥



**श्री मार्तंड प्रभु म०, हुमनाबाद.** ( विद्यमान )

Shri Martanda, Hominabad. ( Alive )

संतकृपा जाली । इमारत फळा आली ॥ १ ॥ ज्ञानदेवें रचिलें पाया । रचियेलें देवालया ॥ २ ॥ नामा तयाचा किंकर । तेणें केला हा विस्तार ॥ ३ ॥ जनार्दन एकनाथ । ध्वज उभारिला भागवत ॥ ४ ॥ भजन करा सावकाश । तुका जालासे कळस ॥ ५ ॥



**श्री घनःशाम म०, वडगांव.** ( ब्रह्मीभूत. )

Shri Ghanasham, Vadagaon. ( Late. )

आलिंगनें घडे । मोक्ष सायुज्यता जोडे ॥१॥
ऐसा संतांचा महिमा । जाली बोलायाची सीमा ॥२॥
तीर्थें पर्वकाळ । अवघीं पायापें सकळ ॥३॥
तुका ह्मणे देवा । त्यांची केली पावे सेवा ॥४॥



**श्री जोतीबा म०, अक्कलकोट.** ( ब्रह्मीभूत )

Shri Joteeba, Akkalkote. ( Late )

वैष्णवांसंगती सुख वाटे जीवा । आणिक मी देवा कांहीं नेणें ॥ १ ॥ गायें नाचें उडें आपुलिया छंदें । मनाच्या आनंदें आवडीनें ॥ २ ॥ लाज भय शंका दुराविला मान । न कळे साधन यापरतें ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां आपुल्या सायासें । आह्मां जगदीशें संभाळावें ॥ ४ ॥



**श्री शिवदत्त म०, पांचाळेश्वर.** ( ब्रह्मीभूत. )

Shri Shivdatt, Panchaleshwar. ( Late )

धन्य आजि दिन । जालें संतांचें दर्शन ॥१॥
जाली पापा तापा तुटी । दैन्य गेलें उठाउठी ॥२॥
जालें समाधान । पायीं विसांवलें मन ॥३॥
तुका म्हणे आले घरा । तोचि दिवाळी दसरा ॥४॥



**श्री दत्तोपंत बाळेकुंद्री, म० बेळगांव.** ( ब्रह्मीभूत )

Shri Dattopant Balekundri, Belgaon, ( Late )

गंगा आली आम्हांवरी । संतपाउलें साजिरीं ॥१॥
तेथें करीन मी अंघोळी । उडे चरणरजधुळी ॥
येती तीर्थावळी । पर्वकाळ सकळ ॥ २ ॥
पाप पळालें जळालें । भवदुःख दुरावलें ॥ ३ ॥
तुका ह्मणे धन्य जालों । सप्तसागरांत न्हालों ॥ ४ ॥



**श्री नुरीदास म० मुंबई.**( विद्यमान. )

Shri Nuridas, Bombay. ( Alive )

तुह्मीं पाय संतीं । माझे ठेवियेले चित्तीं ॥१॥

आतां बाधूं न सके काळ । जालीं विषम शीतळ ॥२॥

भय नाहीं मनीं । देव वसे घरीं रानीं ॥३॥

तुका ह्मणे भये । आता स्वप्नीं ही तें नये ॥४॥

# भक्तिज्ञानवैराग्यपरपदसंग्रह.

## पदें—श्रीबांदकरकृत.

### पद १ लें.

रामा दयाघना क्षमा करुनि मज पाहीं। जरि बहु अपराधी खराचि मी अन्यायी। तुजविण पाहातां रे; संसारीं सुख नाहीं, निमिषभर कांहीं निमिषभर कांहीं ॥ रामा० ॥ ध्रु०॥ कोठिल कोण मी न जाणिला हा पत्ता। आजवरि अज्ञानें मिरविली विद्वत्ता। देहात्मत्वाची स्थिति झाली उन्मत्ता। येउनि जन्मा रे, व्यर्थ श्रमविलि आई, हेच मनिं खाई ॥ रामा० ॥ १ ॥ नाथ अनाथ तूं मायबापही तैसा, परि मी उद्धवलों पतीत पापी ऐसा। तरि निज नामाचें महत्व सांडिसि कैसा। पावन नामा रे, जाच देति रिपु साही, साच वपु दाही ॥ रा० ॥ २ ॥ करुणासागरा राघवा रघुराजा। विषयीं पांगला नका करूं जिव माझा। भजनीं चांगला मिळवीं साधुसमाजा। भुलुनि प्रपंचारे, भ्रमुनि भ्रमुनि ठायीं ठायीं, हरुनि वय जाई ॥ रा० ॥३॥ सच्चित्सुख तो तूं परब्रह्म केवळ। विश्वीं व्यापला तरंगीं जैसें जळ। अवतरतोसि हें उपासकाचें बळ। भक्तजनांला रे, चित्रविचित्र उपायीं; सतत सुखदायी ॥ रा०॥४॥ विष्णु कृष्ण जगन्नाथ तुझा मी लेक। चरणी शरण दे स्मरण आपुलें एक। हातीं संतांची सेवा घडवि अनेक। जगदभिरामा रे, मानस हें तव पायीं, जडविं लवलाहीं ॥ रा० ॥ ५ ॥

### पद २ रें.

विश्वाचा विश्राम रे। स्वामी माझा राम रे। आनंदाचें धाम त्याचें, गाऊं वाचे नाम रे ॥ ध्रु० ॥ चिद्रत्नांची खाण रे। एकाएकीं जाण रे। प्राणाचाही प्राण माझा गड्या तुझी आण रे ॥ वि० ॥ १ ॥ देवाचा जो देवरे तो हा स्वयमेव रे। अलक्ष्य लक्षुनी साक्षी। घेऊं अंगें खेव रे ॥ वि० ॥ २ ॥ शिवाचा आराम रे। भक्तपूर्ण काम रे मुक्त योगीजन गाती। ज्यासी निष्काम रे ॥ वि० ॥ ३ ॥ मिथ्या हे अनेक रे। सत्य राम एक रे। विष्णु कृष्ण जगन्नाथ। करी हा विवेक रे ॥ वि० ॥ ४ ॥

## पद ३ रें.

रघुराय रघुराय मज दाखविं रे निजपाय ॥ ध्रु० ॥ काय करिसि कोणाठायीं आमुचा । जनक आणि तूं माय ॥ मज० ॥ १ ॥ सार नसुनि संसारीं विटलों । दार पुत्र धन चिंतुनि सुकलों । प्रापंचिक व्यवसाय ॥ म० ॥ २ ॥ तारक पतितोद्धारक तूं तरी । पारक जन सुखकारक श्रीहरी । तुज न भजत वय जाय ॥ म० ॥ ३ ॥ फार दुष्ट समुदाय व्यापला । भारहरक अवतार आपुला । अजुनि उशिर तुज काय ॥ म० ॥ ४ ॥ वारंवार किति विनवुं आपणा । गार करी मति हरुनि मीपणा । नुरवुनि सर्व अपाय ॥ मज० ॥ ५ ॥ विष्णु कृष्ण जगन्नाथ तुझा । आठव अंतरिं देवची न दुजा न सुचति अन्य उपाय ॥ म० ॥ ६ ॥

## पद ४ थें.

राजीवनयन हरे, जगज्जीवन मुरारे । निज नेट लाउनि भेटसी कधिं थेट सुविचारें ॥ रा० ॥ १ ॥ कामादि षड्रिपु रे । रामा न ठेविं पुरे । मी रंक तव पदपंकजीं निःशंक करिं बारे ॥ रा० ॥ २ ॥ नरदेह न राहिल रे, परमार्थ जाइल रे ॥ यमराय, दंडिल काय, कशी रघुराय सुटका रे ॥ रा० ॥ ३ ॥ करुणासागर रे अद्वय सुखागर रे । विष्णु कृष्ण जगन्नाथ, नित्य तुज गात, आत्मनिर्धारें ॥ रा० ॥ ४ ॥

## पद ५ वें.

न येसि कां रे अजून प्रभु जानकीजीवना । जगदवना, सुखभवना ॥ न० ॥ १ ॥ पापजनित हे त्रिताप गांजिति माझि मति पहा कशि जिकडून तिकडून मज सोसवेना ॥ न० ॥ २ ॥ न सुचे कांहिं उपाय, हरि हे अपाय, काय पाहसी गम्मत हटकुन पकडून करि शत्रुहवना ॥ न० ॥ ३ ॥ विष्णु कृष्ण जगन्नाथ, दावि निज पाय मज मायबाप तूंचि तुज हुडकून मांडिलें स्तवना ॥ न० ॥ ४ ॥

## पद ६ वें.

तूं झडकरि ये श्रीरामा रे । तूं झडकरि ये श्रीरामा रे श्रीरामा रे, श्रीरामा रे ॥ तूं० ॥ ध्रु० ॥ विषयवासनासंग करी मनोभंग, निजात्मा रामा रे । नामरूपात्मक देहभाव हरी, भेट देउनि सुखधामा रे । सुखधामा रे । सुख धामा रे ॥ तूं० ॥ १ ॥ त्रिविधताप मज जाचवि हे मति । कांचवि मेघ-

श्यामा रे । नाचविते अति चित्त निरंतर कल्पुनि स्त्रीधनकामा रे ॥ धन० ॥ तूं० ॥ २ ॥ विष्णु कृष्ण जगन्नाथ शरण मी, दावी पद स्वयंधामा रे । या मानवजन्मीं भजनरहित जाऊ काल न रिकामा रे । न रिकामा रे॥ तूं०॥३॥

## पद ७ वें.

जगज्जीवन रामीं रमा रे । शरण जाउनि दृढ धरुनि गुरुचरण ॥ ध्रु० ॥ नरजन्माचें सार्थक साचें । जरि करि विवरण आत्मत्वाचें । तरि हे नौका होय भवतरण ॥ रा० ॥ १ ॥ विषयासक्ति त्यजुनि विरक्ति । योगें करितां नवविध भक्ति । सहज मुक्ति सुख हरि जनन मरण ॥ रा० ॥ २ ॥ वैष्णव गुरुवर अद्वय सुखकर । कृष्ण जगन्नाथ राघव तत्पर । नित्य निरंतर अज्ञान-हरण ॥ रा० ॥ ३ ॥

## पद ८ वें.

दाविसि कधिं पाया, हरिति जे अज्ञान अपाया ॥ ध्रु० ॥ आळवितों किति तुज सीतापति मज दर्शन व्हाया । आपुलें मज दर्शन व्हाया । हा मायाब्धि तराया गुण गाया, रघुराया ॥ दा० ॥१॥ मंदहसित मुख अखंडात्म सुख अंगें अनुभवाया । हृदया या उदया या, पदिं काया अर्पाया ॥ दावि०॥ २ ॥ धीर तुझा रघुवीर मानसिक दुःख अंतराया । जीवा या, श्रमवाया, भ्रमवाया सुत जाया ॥ दा० ॥ ३ ॥ कंजलोचना बंधमोचना न करिं उशिर याया । अवताराया, रिपु माराया, उद्धाराया, मन थाराया ॥ दा० ॥ ४ ॥ राम विष्णु कृष्ण जगन्नाथ त्रिभुवन ताराया । भूभाराया तूं हाराया, अघ साराया, अभय कराया ॥ दा० ॥ ५ ॥

## पद ९ वें.

रघुराज न धरि वाज आत्मभक्ति दे सदा ॥ ध्रु० ॥ नरतनु त्वां दिधलि खरी । मळलि विषयिं बहुत परी । करुनि कृपा दृष्टि बरी । सदय हृदय झडकरि मज भेट एकदा ॥ र० ॥ १ ॥ स्थिर धरि सुहृदाप्तवित्त, चंचल विषयांत चित्त । विनवि मी तुज यानिमित्त । न करिं उशिर तळमळे मति येसि तूं कदा ॥ रघु० ॥ २ ॥ विष्णु कृष्ण जगन्नाथ । कळविलि तुज सर्व मात । तूं तो असिसि दीनानाथ । दाखविं सच्चित्सुखमय आपुल्या पदा ॥ र० ॥ ३ ॥

## पद १० वें.

येईं रे येईं रे वेगीं येईं रे श्रीरामा । कां रे अजुनि अंत पाहसी संत-मनोविश्रामा ॥ ये० ॥ ध्रु० ॥ निष्ठुर नव्हसी कधीं आयकों पुराणीं । भक्तजनाची कळवळ ऐसी गर्जे व्यासवाणी ॥ ये० ॥ १ ॥ तुजविण माझें निजसुख बोलवेना । भजन पुजन नित्यनेम चालवेना ॥ ये० ॥ २ ॥ किति आठवूं या खोट्या जाणुनी प्रपंचा । तोटा आयुष्याचा न सरे मोठा कर्म संचा ॥ ये० ॥ ३ ॥ विष्णु कृष्ण जगन्नाथ स्मरे निजनामा । या मानवजन्माचें साधन आपण सुखधामा ॥ ये० ॥ ४ ॥

## पद ११ वें.

मज तारक तूं श्रीरामा रे । ध्रु० ॥ तारक भवभवअवतार तुझा हा । भयहारक निजसुखधामा रे ॥ मज० ॥ १ ॥ फार कठिण संसार तरी हित । कारक गाइन नामा रे ॥ म० ॥ २ ॥ मारक दुर्जन भार कळतक्षण । स्मारक जनविश्रामा रे ॥ म० ॥ ३ ॥ गार करिसी निर्धार भजनीं । सुविचारक जगदभिरामा रे ॥ म० ॥ ४ ॥ विष्णु कृष्ण जगन्नाथ पतित– । उद्धारक मेघश्यामा रे ॥ म० ॥ ५ ॥

## पद १२ वें.

पुरे हरी नको मजला संसार ॥ ध्रु० ॥ मीपण घेउनि व्यर्थचि फिरलों । परि हें सर्व असार ॥ पु० ॥ १ ॥ सूक्ष्म विचारें सत्य गमे कीं । तव नामामृत सार ॥ पु० ॥ २ ॥ कृष्ण जगन्नाथात्मज याचा । वेळ कीर्तनीं सार ॥ पु० ॥ ३ ॥

## पद १३ वें.

नारायणा न तुज ओळखीला ॥ न कळे कांहिं वाटत गोड विषय । साठत पापनिचय आटत सकळ वय कां रे हरे उगिच मला भ्रम येथ करुनि ठेला ॥ ना० ॥ १ ॥ नाहिं नामरस प्रेम धरुनियां से-वियला । फिरतां संसारीं हे लुब्ध झाला साच अनुदिनीं जाच होय जिव वाया गेला ॥ कां० ॥ ना० ॥ २ ॥ दृढ आशापाश तेणें जाय परसदनाला । भासे दुर्दैवयोग आड आला । भजन पूजन ध्यान न घडे खलची केला ॥ कां रे० ॥ ना० ॥ ३ ॥ विप्र जगन्नाथ बाळ करि

आळ होई त्याला । प्रसन्न तोडीं भवबंधनाला ॥ दुर्जन षड्वैरी यांचे संगें कृष्णदास भ्याला ॥ कां० ॥ ना० ॥ ४ ॥

## पद १४ वें.

तुज नमो जनकजापति ॥ राघवा ॥ तुज नमो श्रीसितापती । तूं घालिसी उडी भक्तांचे संकटीं ॥ तुज० ॥ ध्रु० ॥ सच्चिदानंद जो मुळिं, तो तूं दशरथकुळीं ॥ अवतरला, जगिं भरला ॥ तु० ॥ १ ॥ दुस्तर भवजलधि, निस्तारिं हा निरवधि ॥ प्रभु सदया, करुनि दया ॥ तु० ॥ २ ॥ मारिलें त्वां असुरांसि, तारिलें नरसुरांसी । वारुनी भया, करि अभया ॥ तु० ॥३॥ विष्णु कृष्ण जगन्नाथा । रक्षिसि मज अनाथा । लक्षुनि बरा, जानकिवरा ॥ तु० ॥ ४ ॥

## पद १५ वें.

गुरूचा विसरूं कसा उपकार ॥ ध्रु० ॥ स्वस्वरुपाच्या अनुसंधानें । हरिला हा जडभार ॥ गु० ॥ १ ॥ कोण मी याचा विचार पहातां । चरणीं दिधला थार ॥ गु० ॥ २ ॥ कृष्ण जगन्नाथात्मजासि । वैष्णव सद्गुरुचा आधार ॥ गु० ॥ ३ ॥

## पद १६ वें.

गुरुनि ऐसी चटक लाविलि मोठी । स्वयंभ हृदयीं मज देउनि भेटि ॥ ऐ० ॥ ध्रु० ॥ विसरवि देहघट आपण होय प्रगट । बुजुनि द्वैताचि वाट आनंदीं लोटी ॥ ऐ० ॥ १ ॥ नावडे विषय धन केवळ वाटे वमन होउनि मन उन्मन स्वरूप घोंटी ॥ ऐ० ॥ २ ॥ विष्णु गुरु ज्ञानदृष्टि व्यापुनि नुरवि सृष्टि । कृष्ण जगन्नाथ गोष्टी न वदे खोटी ॥ ऐ० ॥ ३ ॥

## पद १७ वें.

जप तूं राम नाम किती मधुर मधुर मधुर मधुर ॥ ज० ध्रु० ॥ रामनामध्वनि उमटे । तेथें लक्ष लावि नेटें । ब्रह्मानंद सहज भेटे, प्रचुर प्रचुर प्रचुर प्रचुर ॥ ज० ॥ १ ॥ दृश्य देखतांचि दिठी । देईं द्रष्टेयासि मिठी, आपुलें आपण सौख्य घोटीं । न दुर न दुर न दुर न दुर ॥ ज० ॥ २ ॥ राम विष्णु कृष्ण ध्यान त्यासि दे मुकुंद ज्ञान, जेणें होय समाधान, चतुर चतुर चतुर चतुर ॥ ज० ॥ ३ ॥

## पद १८ वें.

जाई गुरुपायीं लाग वेगेंसीं हित पाहीं रे । नरतनु हे स्थिर नाहीं, विषयीं भरसि परि, पडसि अपायीं ॥ न० ॥ ध्रु० ॥ स्त्रीपुत्रसुहृत् तुज वाटे हित, यम घाला घालि तेव्हां, करिसि तूं कायी ॥ न० ॥ १ ॥ कोण कोणाचा यांत जिवाचा । भुलसि फुकट कायी धरिसि पिसायि ॥ न०॥२॥ विष्णुगुरुपदा आठवुनि सदा । कृष्ण जगन्नाथ झाला सुखरूप ठायीं ॥ न० ॥ ३ ॥

## पद १९ वें.

रात्रदिन राम गावूं रे । पुत्रकलत्रसुखभ्रम पुरे पुरे ॥ रा० ॥ ध्रु० ॥ छत्रसुखासनिं माझा, स्वामि अयोध्येचा राजा, शोभे आजानुबाहू रे ॥ रा० ॥ १ ॥ वामांकीं जानकिनार संमुख मारुतीवीर, दिसे सुंदर पाहुं रे ॥ रा० ॥ २ ॥ राम विष्णुपदीं चित्त ठेवी कृष्ण जगन्नाथ, सुख अद्वैत लाहूं रे ॥ रा० ॥ ३ ॥

## पद २० वें.

राम जडला न सोडी । घडि घडि ओढी काय सांगूं तुज गोडी ॥ ध्रु०॥ नुरवितो दृश्यगुण, दावितो मुळींचि खुण, आपणा आपण जोडी ॥ रा०॥१॥ जेथें धांवे तेथें मन रामचि होय चिद्घन बाई द्वैतभान मोडी ॥ रा० ॥२॥ राम विष्णु गुरुप्रीति, कृष्ण जगन्नाथीं अति, हरि देह मति खोडी ॥रा०॥३॥

## पद २१ वें.

श्रीरामनाम गावूं फुकासाठीं ॥ धृ० ॥ धरुनी संसार पोटीं वदतां विषय-गोष्टि । काय लाभ हो शेवटीं । उमजा मनासी ॥ ना० ॥ १ ॥ करितां प्रपंचऱ्हाटी । वय जाय आटाआटीं । काळ लागलासे पाठी । नकळतां ग्रासी ॥ ना० ॥ २ ॥ वैष्णव सद्गुरु भेटीं । नुरविति दुःखें कोटी । कृष्ण जगन्नाथ घोंटी स्वरूपानंदासी ॥ ना० ॥ ३ ॥

## पद २२ वें.

नांदवि त्रिभुवन जो जगजीवन । पतीतपावन दशमुखकंदन ॥ ध्रु० ॥ मतिवरि पसरा देव न दुसरा । हृदयिं न विसरा श्रीरघुनंदन ॥ नां० ॥ १ ॥ सज्जन पालक ब्रह्मांडचाळक । श्रीराघव एक हरि भवबंधन ॥

नां० ॥ २ ॥ विष्णु गुरु तोच श्रीराम रुचतो । कृष्ण जगन्नाथ सुखरुप करि वंदन ॥ ना० ॥ ३ ॥

## पद २३ वें.

सदैव राम राम ह्मणा रे बापांनों ॥ सदै० ॥ नरतनु हे दुर्लभ गणा रे ॥ बा० ॥ ध्रु० ॥ तुह्मिं प्रपंच केला जरि निका । तरि होइल शेवटिं हा फिका । यम काढिल शोधुनि बहु चुका । मार मारिल कठिण आयिका रे ॥ बा० ॥ १ ॥ काय घालवितां वय फुका । ध्यानिं आठवा रघुनायका । ब्रह्मत्वें आपणा तुका । जन्ममरणाला मग मुका रे ॥ बा० ॥ २ ॥ देह पडेल कधिं न भरंवसा । निजआत्मा आपुला कसा । हें जाणत एकांतीं बसा । न कळे तरि गुरुला पुसा रे ॥ बा० ॥ ३ ॥ मोठेपणिंचा अभिमान सोडा । छी छी देह मीपण खोडा । दृढ असंगशस्त्रें तोडा । आहे अखंड सुख तें जोडा रे ॥ बा० ॥ ४ ॥ जागिं तारक वैष्णव गुरू । त्यांचे चरण जाउनि दृढ धरूं । कृष्ण जगन्नाथ सांगे उद्धरूं । आपआपणां सावध करूं रे ॥ बा० ॥ ५ ॥

## पद २४ वें.

भवजलधिमधिल भय हरिल सकल । बलभीम हा मारुती ॥ ध्रु० ॥ वांचविला ज्याणें लक्ष्मण प्राणें वेगें न लगतां क्षण आणुनियां द्रोणाचल ॥ बल० ॥ १ ॥ अंजनिबाळक त्रैलोक्यचाळक जेणें लंकेमाजि केला रावणासि कलकल ॥ बल० ॥ २ ॥ श्रीरामसेवक कल्याणकारक । राम विष्णु कृष्ण जगन्नाथ स्मरण अचल ॥ ब० ॥ ३ ॥

## पद २५ वें.

धन्य एक मारुति सेवक रामाचा । अन्य नाहीं त्रिभुवनिं कायामनेंवाचा ॥ ध्रु० ॥ देह लंकेमाजि शोधी जाणिवे सीतेला । जाणतां अशोकमूळीं भेटावया गेला ॥ ध० ॥ १ ॥ दाविली खुणा तिसी निज राममुद्रा । पाहतां तन्मय झाली आनंदसमुद्रा ॥ ध० ॥ २ ॥ अद्वय होउनि सीतारामीं लीन झाला । रामनामस्मरणाचा नित्यनेम ज्याला ॥ ध० ॥ ३ ॥ अभय वरदहस्त करूनियां उभा । वामकर कटीं ठेउनि दावि दिव्य शोभा ॥ ध० ॥ ॥ ४ ॥ मारुति संकट हारी रामभजकांचा । विष्णु कृष्ण जगन्नाथा उपयोगी साचा ॥ ध० ॥ ५ ॥

## पद २६ वें.

तो तो सुखात्मा करि स्वहित साचें जो ॥ ध्रु० ॥ पावतां मनुष्यदेह । सांडुनि वैषयिक स्नेह । विसरुनि स्त्रीपुत्र गेह श्रीगुरुपदीं रत होउनि स्वरूप मात्र जो ॥ तो तो० ॥ १ ॥ देखतांचि दृश्य द्वैत । कोण मी हा धरुनि हेत । आपुला आपण शोध घेत । सच्चित्सुखविवरणांसि परम पात्र जो ॥ तो तो० ॥ २ ॥ विष्णुगुरुपदाब्जभृंग । कृष्ण सेवितो असंग । चिदानंद मधु अभंग । प्राशित निज हित उमजुनि दिवसरात्र जो ॥ तो तो० ॥ ३ ॥

## पद २७ वें.

रामहृदयगगनरवि उघड करिल त्या सुजना मी नमीं ॥ ध्रु० ॥ बिंब प्रतिबिंबातें निवडुनि ऐक्यविचारें भेद हरिल । त्या सु० ॥ १ ॥ नासुनि जग नग अंतर्ज्ञानें, आत्म कनक जो सत्य वरिल ॥ त्या सु० ॥ २ ॥ दृश्य भास शब्दसह सांडुनि, अखंड आत्मस्फूर्ति धरिल ॥ त्या सु० ॥३॥ ग्रासुनि मीपण एकचि आपण, निजानंदपरिपूर्ण स्मरिल ॥ त्या सु० ॥ ४ ॥ विष्णु कृष्ण जगन्नाथाचा अखंड अद्वय पथ विवरिल ॥ त्या० ॥ ५ ॥

## पद २८ वें.

पाहूं या गुरुदत्त अवधूत वेषधारी । अनसूया अत्रिऋषि नारीचा पुत्र मनोहारी । त्रैमूर्ति अवतारी ॥ पा० ॥ ध्रु० ॥ रमतां विषय सुखीं तळमळ दुःख शेखीं नाहीं घडि विश्रांति संसारीं । पुरे पुरे किति येराझारी भोगिल्या अविचारीं गुंतुनि गृहदारीं ॥ पाहूं० ॥ १ ॥ गुरुवर तारक निज-सुखकारक भेटतां संतोष होय भारी । प्रगटला नित्यनिर्विकारी भक्तांचा सहकारी संकटें विघ्नें वारी ॥ पाहूं० ॥ २ ॥ धन्य धन्य नर नारी दर्शना येती सामोरी दत्त दत्त नाम हें उच्चारी । विष्णु कृष्ण जगन्नाथा तारी उघड चराचरीं व्यापक जिव्हारी ॥ पाहूं० ॥ ३ ॥

## पद २९ वें.

श्रीपाद श्रीवल्लभ श्रीगुरु देवदत्त यतिराया ॥ ध्रु० ॥ तुजविण मजला क्षणभर न रुचे प्रपंच धनसुतजाया ॥ स्वयंप्रकाशक दर्शन दे मज हरुनि अविद्या माया ॥ श्री० ॥ १ ॥ दत्त दिगंबर तन मन धन हें अर्पण तुझिया पायां ॥ स्वस्वरुपीं स्थिरवृत्ति रहाया दाखवि निजपदठाया ॥ श्री० ॥ २ ॥

विष्णु गुरु कृष्ण जगन्नाथा आवडि भजन कराया । अखंड ब्रह्मानंदस्फूर्ति वाढवि चित्त रमाया ॥ श्री० ॥ ३ ॥

## पद ३० वें.

श्रीगुरु यतिवर जोडुनि प्रार्थितों कर न पडूं निज विसर दत्त दिगंबर ॥ध्रु०॥ होउनियां अविचार चरणिं चुकलों फार शरण तुज निर्धार वारी देह-अहंकार ॥ श्री० ॥ १ ॥ त्रिविध तापहर करी देवा मजवर करुणा जलधर वृष्टि निरंतर ॥ श्री० ॥ २ ॥ श्रीदत्त विष्णुगुरु हृदयकमलिं धरूं कृष्ण जगन्नाथ स्मरूं त्रिभुवनीं सुंदर ॥ श्री० ॥ ३ ॥

## पद ३१ वें.

सेवुं दत्तगुरु दत्त दत्तगुरु दत्तनामरस रे ॥ ध्रु० ॥ विषयमदें उन्मत्त चित्त हें सच्चित्सुख विसरे । पुत्र वित्त गृह कलत्र चिंतुनि मोहजाळीं पसरे ॥ से० ॥ १ ॥ ज्या रसपानें संसारांतुनी पाय सहज निसरे । काय लाभ तरि याहुनि मनुजा पुनर्जन्म घसरे ॥ से० ॥ २ ॥ अजरामर होसी रस प्याया एकांतीं बस रे । विष्णुचरणीं कृष्ण जगन्नाथाचें मानस रे ॥ से० ॥ ३ ॥

## पद ३२ वें.

शरण आलों तुजला गुरुवरा ॥ ध्रु० ॥ शरण आलों मज्जनन मरण हर चरणकमल दावि दत्त दिगंबर ॥ श० ॥ १ ॥ पावन करि देहभाव हरुनि मज ठाव देउनि पदिं रक्षि निरंतर ॥ श० ॥२॥ गलिताहंकृति होईल कधिं मति प्रपंच हा अति होय भयंकर ॥ श० ॥ ३ ॥ स्मरण अविद्या हरणार्थ करि विष्णु कृष्ण जगन्नाथ निजपदीं किंकर ॥ श० ॥ ४ ॥

## पद ३३ वें.

तो हा दत्त चिद्घन आला रे ॥ ध्रु० ॥ नेटें भक्तांच्या अनसूयात्रिचा पुत्र त्रैमूर्ति झाला रे । पायीं पादुका शोभति ज्याच्या कंठीं रुद्राक्षमाला रे ॥ तो० ॥ १ ॥ काषायांबरधारी तुंबर नारद गाती ज्याला रे । औदुंबरीं वास रक्षी भक्तांस जो वश गायनाला रे ॥ तो० ॥ २ ॥ तारक भवहारक सुखकारक हा जिवाला रे । श्री विष्णुगुरुच्या कृपें कृष्ण जगन्नाथ निवाला रे ॥ तो० ॥ ३ ॥

## पद ३४ वें.

· दत्त विष्णु गुरु नरहरि राम एक झाला । सच्चित्सुख आपण हा अनुभव जयीं आला ॥ ध्रु० ॥ करितां संसार काम आठवतें नित्य नाम । तेंचि ब्रह्मानंदधाम पाववी जिवाला ॥ द० ॥ १ ॥ द्रष्टा हें दृश्य सकळ नटला तरि स्थिति अविकल । नुरउनि अज्ञानपटल स्वस्वरूपीं विराला ॥ द० ॥ २ ॥ दत्त विष्णु गुरु नरहरि रामनाम जप अंतरिं । कृष्ण जगन्नाथ वरी अद्वय-भजनाला ॥ द० ॥ ३ ॥

# पदें—श्रीवासुदेवानंदसरस्वतिकृतकरुणात्रिपदी.

## पद ३५ वें (उद्धवा शांतवन कर जा.)

शांत हो श्रीगुरुदत्ता मम चित्ता शमवीं आतां ॥ ध्रु० ॥
तूं केवळ माता जनिता सर्वथा तूं हितकर्ता ॥ तूं आप्त स्वजन भ्राता सर्वथा तूंचि त्राता ॥ चाल ॥ भयकर्ता तूं भयहर्ता । दंडधर्ता तूं परिपाता ॥ तुजवांचुनि न दुजी वार्ता ॥ तूं आर्तां आश्रय दत्ता ॥ १ ॥ अपराधास्तव गुरुनाथा जरि दंडा धरिसि यथार्था ॥ तरि आह्मी गाउनि गाथा तव चरणीं नमऊं माथा ॥ चाल ॥ तूं तथापि दंडिसि देवा । कोणाचा मग करुं धांवा । सोडविता दुसरा तेव्हां ॥ कोण दत्ता आम्हां त्राता ॥ २ ॥ तूं नटसा होउनि कोपी दंडितांहि आह्मी पापी । पुनरपिहि चुकतां तथापि आह्मावरि नच संतापी ॥ चाल ॥ गच्छतःस्खलनं क्वापि । असें मानुनि नच हो कोपी । निजकृपालेशा ओपी ॥ आह्मांवरि तूं भगवंता ॥ ३ ॥ तव पदरीं असतां ताता । आडमार्गीं पाउल पडतां ॥ सांभाळुन मार्गावरता आणिता न दुजा त्राता ॥ चाल ॥ निजब्रीदा आणुनि चित्ता । तूं पतितपावना दत्ता । बळें आतां आह्मांवरता । करुणाघन तूं गुरुनाथा ॥ ४ ॥ सहकुटुंब सहपरिवार दास आह्मी हे घरदार । तव पदीं अर्पुं असार संसार।हित हा भार ॥ चाल ॥ परि हरिसी करुणासिंधो । तूं दीनानाथ सुबंधो । आह्मां अघलेश न बाधो ॥ वासुदेव प्रार्थित दत्ता ॥ ५ ॥

## पद ३६ वें. (इसतन धनकी.)

श्रीगुरुदत्ता जय भगवंता ॥ तें मन निष्ठुर न करीं आतां ॥ श्रीगुरु० ॥ ध्रु० ॥ चोरें द्विजांसी मारितां मन जें ॥ कळकळलें तें कळकळो आतां॥१॥

पोटशुळानें द्विज तडफडतां ॥ कळकळलें तें कळकळो आतां ॥ श्री० ॥२॥
द्विजसुत मरतां वळलें तें मन ॥ हो कीं उदासिन न वळो आतां ॥ श्री० ॥३॥
सतिपति मरतां काकुळति येतां ॥ वळलें तें मन न वळे किं आतां ॥ श्री० ॥४॥
श्रीगुरुदत्ता त्यजि निष्ठुरता ॥ कोमल चित्ता वळवीं आतां ॥ श्री० ॥ ५ ॥

### पद ३७ वें. ( इसत० )

जय करुणाघन निजजनजीवन ॥ अनसुयानंदन पाहि जनार्दन ॥ ध्रु० ॥
निजअपराधें उफराटि दृष्टि ॥ होउनि पोटीं भय धरूं पावन ॥ ज० ॥ १ ॥
तूं करुणाकर कधिं आह्मांवर ॥ रुससि न किंकर वरद कृपाघन ॥ ज० ॥२॥
वारीं अपराध तूं मायबाप ॥ तव मनिं कोप लेश न वामन ॥ ज० ॥ ३ ॥
बालकापराधां गणि जरि माता ॥ तरि कोण त्राता देइल जीवन ॥ ज० ॥४॥
प्रार्थी वासुदेव पदीं ठेवी भाव ॥ पदीं देवो ठाव देव अत्रिनंदन ॥ ज ० ॥५॥

## पदें—श्रीसोहिरोबानाथ आंबियेकृत.

### पद ३८ वें.

वंदियला भगवंत । तो म्यां वंदियला भगवंत ॥ ध्रु० ॥ भवसिंधुतारक, निजसुखकारक । सकळां आदिअंत ॥ तो म्यां० ॥ १ ॥ सज्जनरंजन, अखिल निरंजन । भक्तजनां कृपावंत ॥ तो म्यां० ॥२॥ वेद झाले मुके, शेष न स्तवूं शके । ज्याचें रूप अनंत ॥ तो म्यां० ॥ ३ ॥ नव्हे नरनारी, गैबी सूत्रधारी । हालवि जो जिवजंत ॥ तो म्यां० ॥ ४ ॥ ह्मणे सोहिरा, अनुभवीं पाहणें । चित्सुख वनवसंत ॥ तो म्यां० ॥ ५ ॥

### पद ३९ वें.

तुजविण रे भगवान् । कोठेंचि मन हें न जडो ॥ ध्रु० ॥ मिथ्या ऐसें दिसोनि सकळिक, विषयसुख नावडो । प्रारब्धास्तव जें जे समयीं, घडेल तें सुखिं घडो ॥ तुज० ॥ १ ॥ योग लक्षण निज धैर्यबळें जीव, मोहांत न सांपडो । आयुष्य सरल्यावर मग केव्हां देह, पडेल तेथें सुखी पडो ॥ तुज० ॥ २ ॥ वैराग्य ज्ञानी प्रचंड होउनि, अखंडित वाक्य कडकडो । प्रपंच रहाटीं वर्तत असतां, कोणिकडे न अडो ॥ तुज० ॥ ३ ॥ ह्मणे सोहिरा विपरित बुद्धी, कुसंग हा विघडो । निमिष साधुनी केवळ ब्रह्मींचें मोक्षद्वार उघडो ॥ तुज० ॥४॥

## पद ४० वें.

संकट भगवान् निवारी ॥ ध्रु०॥ घडी घडी पळ हरिस्मरण करितां, भवसागर हा तारी। समर्थ स्वामि उदार दाता, भक्त जनां कैवारी॥ संकट० ॥१॥ गगनाहुनी जो सूक्ष्म ब्रह्म हा, अनादी नट विहारी । लीलाविग्रही अनंतरूपी जो, पुरुष नव्हे हे नारी ॥ सं० ॥ २ ॥ ह्मणे सोहिरा भरण पोषण चिंता, पडो नेदि हे भारी । पुनरपी न घाली गर्भवासीं, जीवासी या संसारीं ॥ संकट० ॥ ३ ॥

## पद ४१ वें.

जगजीवनजी दीनोद्धार ॥ ध्रु०॥ आत्मानात्मविवेक सुमति सुख दावी हें सारासार।लटिकें देह हें गेह करुनि जिव भोगितसे दुःख फार ॥ ज०॥१॥ मुक्त करोनियां गुप्तस्वरूपीं दे दर्शन उक्त प्रकार । हे विश्वंभर करुणाकर लौकर भवसिंधु करिं पार ॥ ज० ॥ २ ॥ योग युक्ति दे शून्य मंडळीं मन हें जाऊं एक वार । भक्तकाजकल्पद्रुम सद्गुरु दाता परम उदार ॥ ज० ॥३॥ ह्मणे सोहिरा काम क्रोध मारु मदमत्सर दानवा करणें मार । युगायुगिं तूं धरिशी नाना रूप लीला अवतार ॥ ज० ॥ ४ ॥

## पद ४२ वें.

भगवंता दर्शन देईंरे ॥ ध्रु० ॥ मी कोण मज येउंदे कळोनी, तेथ मन हें वळोनी, जाउंदे गळोनी, निशिदिनीं निर्गुण वनीं लय हो लाईंरे ॥ भ०॥१॥ काना ऐकवी, नयना दाखवी, त्वचेला कळवी, रसने चाखवी, परिमळ लेववी, शेवटीं कोण हा कोठें तूं नाहीं रे ॥ भ०॥२॥ ह्मणे सोहिरा मृगजलवत् संसार दिसोनियां, विषयसुख किमपि मजला रुचों देउं नको कांहीं रे ॥ भग० ॥ ३ ॥

## पद ४३ वें.

मना ईश्वरभजनीं तूं रत रे ॥ ध्रु० ॥ मृगजळवत् तूं जाण असार । प्रपंचींहुनि परत रे ॥ मना० ॥ १ ॥ त्वरित तूं घेईं हें परम पीयूष । आयुष्य गेलें सरत रे ॥ मना० ॥ २ ॥ अलक्ष लक्षा जाणुनि अंतरीं । विलोकन करीं तूं सुरत रे ॥ मना० ॥ ३ ॥ ह्मणे सोहिरा पहा तें पहाणें । स्थिरावतां मुळिं जैसें लवण जळीं विरत रे ॥ मना० ॥ ४ ॥

## पद ४४ वें.

गोविंद वंद तो नंदसुत आनंदकंद आराम ॥ ध्रु० ॥ मंद अनिळ सुगंध शीतळ नितळ चंद्रीं व्योम । सुंदर मेघश्याम मनोहर कुंजत गोपींसी काम ॥ गो० ॥ १ ॥ वसंत अवघे पसंत वन करी घसंत मदनोद्दाम । अतिरति करितां बल्लवयुवती पावती मोक्षधाम ॥ गो० ॥ २ ॥ न्हाटति तपिये दाटति पवना आटति इंद्रियग्राम । ह्मणे सोहिरा सर्व घटीं हरि देखति आत्माराम ॥ गो० ॥ ३ ॥

## पद ४५ वें.

सार्थक माझें हें करीं तूं ॥ ध्रु० ॥ अच्युत केशव परमानंदा गोविंदा ये मुकुंदा । कायासुमनांतिल मकरंदा जगव्यापका श्रीहरी तूं ॥ सा० ॥ १ ॥ ज्ञानसुख या अमला पाजुनि समाधी लावीं हे मला । अद्वय कमळा विकाश करुनी मोहांतुनि उद्धरीं तूं ॥ सा० ॥ २ ॥ लय हें लागो हेंचि मागों चित्त हें वितरागो । नित्य निरंजन जागो मनिंचा जाऊं नये क्षणभरी तूं ॥ सा० ॥ ३ ॥ ह्मणे सोहिरा पाप पुण्य हीं दोन्ही घडती कर्मबिजापासोनी । तें बिजचि कीं नासोनि मजवरि कृपा करीं लवकरी तूं ॥ सा० ॥ ४ ॥

## पद ४६ वें.

हरिस्मरणविस्मरण तरी तुझें काय जिणें रे असून ॥ ध्रु० ॥ स्वार्थचि साधिसी सार्थक नेणसी, कोणासि पहातरी पुसून । पुढें नाहीं गति मळिन जाहलि मति, साधुचि संगती नसून ॥ हरि० ॥ १ ॥ रति विलासीं लंपट होसी, मानस गेलें डसून । लवकर सर कीं पडसिल नरकीं, फुकट मरसिल कुसून ॥ हरि० ॥२॥ आळशि कामा उगा रिकामा, थट्टाचि करिसी बसून । कुकर्माच्या, कांहिं वर्माच्या गोष्टी सांगसी कसून ॥ हरि० ॥३॥ शरीर फिरवी तुजला मिरवी, देव असे रे रुसून । जवळी असून तुझे हृदयीं वसून, भगवंत न येरे दिसून ॥ हरि० ॥ ४ ॥ ह्मणे सोहिरा गुरुनाथ हा, माझ्या हृदयीं घुसून । जनांसी उद्धरावयाकारणें, वचन सांगतो ठसून ॥ हरि० ॥ ५ ॥

## पद ४७ वें.

तुम्ही अचल पदीं राहोन सदोदित अद्वय सुख कां ध्याना ॥ ध्रु० ॥ प्रथमचि वाटत गोड विषयसुख, शेवट विषवत् भाना । श्रवण मनन अध्यात्म

निरूपण, क्षणभरि चित्त कां द्याना ॥ तुह्मी० ॥१॥ मायामोहें भ्रमतां रमतां चेष्टा करितां नाना । ध्यानीं भजनीं मनचीं नाहीं, व्यर्थचि करितां तनाना ॥ तुह्मी० ॥ २ ॥ जागृति स्वप्न सुषुप्तित साक्षी, कवण तो आणुनि ध्याना। अभिप्राय गुरुगम्य हें दुर्लभ, नेणुनि आत्मज्ञाना॥ तुह्मी० ॥ ३ ॥ निर्मल निश्चळ जाणूं या तव, स्वरूप जया अनुमाना । ह्मणे सोहिरा ब्रह्मभुवनिंचें, परमामृत कां प्याना ॥ तुह्मी० ॥ ४ ॥

## पद ४८ वें.

हरिभजनाविण काळ घालवूं नकोरे ॥ ध्रु० ॥ दोरिच्या सापा भिउनि भवा, भेटि नाहिं जिवा शिवा । अंतरिंचा ज्ञानदिवा मालवूं नकोरे हरि० ॥१॥ विवेकाची ठरेल ओल, ऐसे बोलावे कीं बोल । आपुले मतें उगीच चिखल कालवूं नकोरे ॥ हरि० ॥ २ ॥ संतांचे संगतिनें उमज, आणुनि मनीं पुरतें समज । अनुभवावीण मान, हालवूं नकोरे ॥ हरि० ॥ ३ ॥ सोहिरा ह्मणे ज्ञानज्योती, तेथें कैचि दिवसराती । तयाविणें नेत्रपातीं, हालवूं नकोरे ॥ हरि० ॥ ४ ॥

## पद ४९ वें.

शिव हर शंकर मदनारी देह हें अर्पण तुज केलें ॥ ध्रु० ॥ तव भजन पूजन ध्यानीं मन हें। तन्मय होउनि ठेलें ॥ शि० ॥ १ ॥ चित्त हें गिरिवर वधूवल्लभा । स्वरूप पहावया भुकेलें ॥ शि० ॥ २ ॥ जय विश्वेश्वर भगवान् स्मरतां। विषयस्मरण गेलें ॥ शिव० ॥ ३ ॥ जीवन्मुक्त करुनि भक्तांसी । त्वां कैलासभुवनीं न्हेलें ॥ शिव० ॥ ४ ॥ सोहिरा ह्मणे तरि होऊं सके । बहुत जन्मीं पुण्य केलें ॥ शिव० ॥ ५ ॥

## पद ५० वें.

हरा रे दर्शन तूं देईं मज गिरिजावरा ॥ ध्रु० ॥ त्रिलोचना भावमोचना आकुंचन करीं मन उन्मन चिद्घन अणु रेणु व्यापक अमरा ॥ हरा० ॥१॥ कपर्दीश ईश स्मशानवासी भस्मधारण त्रिशूलडमरुपिनाकपाणी व्याघ्रांबरधर शिवशंकरा ॥ हरा० ॥ २ ॥ वृषभवाहना भुजंगभूषण पंचानन नीलग्रीव शंभो शशिशेखर गंगाधर दिगंबरा ॥ हरा० ॥ ३ ॥ ह्मणे सोहिरा कल्पवृक्ष चिंतामणि सिद्धि आज्ञांकित तुज सकळिक साधन पूर्णकाम अभिवृद्धि अभयंकरा ॥ हरा० ॥ ४ ॥

## पद ५१ वें.

स्मर पार्वतीच्या वराला ॥ ध्रु० ॥ श्रवण मनन निजध्यास नयनीं जनिं वनीं पाहुनी विसरीं तूं आपपराला ॥ स्मर० ॥ १ ॥ जटामुकुट नीलकंठ त्रिलोचन पंचानन मुनिजनमनमोहन वृषभारूढ हराला ॥ स्म० ॥२॥ खपरुडमरुधर पिनाकपाणी दक्षयज्ञमथन मदनारी देतो परम अभयप्रद वरद कराला ॥ स्मर० ॥ ३ ॥ ह्मणे सोहिरा अर्चन वंदन आत्मनिवेदन नवविध भजन सकळहि संपत्ति चालुनि येती घराला ॥ स्मर० ॥ ४ ॥

## पद ५२ वें.

तो काय प्राणी। विसरला हरिला जन्मापासून ॥ ध्रु० ॥ करितां संसारधंदा, आठवीना गोविंदा, नित्य करी द्वेष निंदा, सांपडला भवबंदा, चिंतेनें चूर। केला ग्रासून ॥ तो काय० ॥ १ ॥ भुलला जो शब्दनादीं संतोषला शास्त्रवादीं। कीर्तिसाठीं विद्या साधी, त्याला अभिमान बाधी। नाना छंदीं बुद्धि गेली नासून ॥ तो काय० ॥ २ ॥ देहाला मी ऐसें मानी, निरंतर आपणा वानी। पडला संशयाचे रानीं, विचार हा न घे कानीं। डुलतसे मोहमदिरा प्राशून ॥ तो काय० ॥ ३ ॥ अवकाश जहाल्यावेळे, भलताच्चि खेळ खेळे। गर्वमदें सदा घोळे, अन्यथा सुखांत लोळे। सांगूं जातां बोले डोळे त्रासून ॥ तो काय० ॥ ४ ॥ लटिकें खरें करी बासून, संसारीं जो घेतो घांसून नक्कल करी मारी हांसून, त्रिविध तापें घेतो लासून। दुःखशोकें पडतो दांत वासून ॥ तो काय० ॥ ५ ॥ सोहिरा म्हणे व्यर्थ जन्म निष्फळ त्याचें क्रियाकर्म। पांघुरला शरीरचर्म, जो कां नेणे मुळिंचेंवर्म। कोण्या कामाचा हा काय असून ॥ तो काय० ॥ ६ ॥

## पद ५३ वें.

विसरूं नको तो देव। जो हरी साक्षिभूत स्वयमेव ॥ ध्रु० ॥ तारुण्यकाळीं पुण्यदशेचा होउं पाहतो चेव। रंगरुपाला भुलूं नको तूं पाहत स्त्रियांचे ठेव ॥ विसरूं० ॥ १ ॥ अंतकाळ हा पावे तोंवरी भवसागर हा पेंव। वैराग्य विवेकें संगाविरहित सदैव सुख हें सेव ॥ विसरूं० ॥ २ ॥ पराधीनता पावेल तेव्हां विस्मय पडेल भेव। स्वइच्छ असणें यास्तव घरघर भिक्षा मागुनि जेव ॥ विसरूं० ॥ ३ ॥ म्हणे सोहिरा त्यावांचून हें शरीर केवळ शव। स्वयंप्रकाशक सत्ता ज्याची चालवी हे अवयव ॥ विसरूं० ॥४॥

## पद ५४ वें.

सद्गुरुसी हटका, आतां करा आपली सुटका । दृश्य भास नाश पावे स्थिर नोहे घटका ॥ ध्रु० ॥ लिंगदेहा ये मृदुता, सांपडेल अटका । आत्म-ज्ञान उमजुनियां, आधींच तुह्मी सटका ॥ सद्गु० ॥ १ ॥ करितो लीला टिळे माळा, प्राणी नीटनेटका । केव्हां नेणों पाठीवरी काळ मारिल मुटका ॥ सद्गु० ॥ २ ॥ भजनावांचुनि कधीं वेळ, नका घालऊं लटका । मनीं राम मुखीं नाम, करीं मार चुटका ॥ सद्गु० ॥ ३ ॥ सोहिरा ह्मणे राहुं नका, घट जसा फुटका । निरंजनीं पूर्ण बोध, प्रेम पिवा घुटका ॥ सद्गु० ॥४॥

## पद ५५ वें.

तसा तूं भज रे आपुल्या मुळाला ॥ ध्रु० ॥ न दाखवितां गोडी गुंतुनियां चावडी । शोधुनि काढी जशी मुंगी गुळाला ॥ त० ॥ १ ॥ कोठें तें वन कोठें जीवन । धांवत कोरी भ्रमर जैसा कमळाला ॥ त० ॥ २ ॥ चंदन आंगा उमगुनी । चांगा जडला तो नाग जसा परिमळाला ॥ तसा० ॥ ३ ॥ ह्मणे सोहिरा देव भक्त एकचि होती । जोतीला ज्योति मिळोनि जाय जशें लवण जळाला ॥ तसा० ॥ ४ ॥

## पद ५६ वें.

हकनाहक आयुष्य जाय, प्राण्या तूं उगाच बसशी काय ॥ ध्रु० ॥ म-नासी मानेल तेंच तूं करिसी, देवासी जें कां न साय । विचार बोलुनि करिसी तूं अवघा, कृत्रिम हा व्यवसाय ॥ हक० ॥ १ ॥ अति प्रीतीनें देहा पाळिसी भिक्षुकां देसी दुराय । अनुतापाविण नरकीं पडसी, मग हा नचले उपाय ॥ हक० ॥ २ ॥ स्वदारा हो परदारा हो, भुलणें हाचि अपाय । भोग भोगितां रोग उठती, रक्तपित्तकफादिक वाय ॥ हक० ॥ ३ ॥ अनादि हा सत्य ईश्वर, ह्मणोनी सोहिरा गाय । मलाही दिसतो तुलाही सांगतो, पुढील तरणोपाय ॥ हक० ॥ ४ ॥

## पद ५७ वें.

भगवंताला स्मराल, तरि हा भवसागर तुह्मी तराल हो ॥ ध्रु० ॥ पापा-मध्यें न रहाल, शुद्ध हें पुण्यचि करा तराल । आणि योगी व्हाल, तरि मो-हफणीचें विष उतराल हो ॥ भग० ॥ १ ॥ आत्मा ना विसराल, विषयतृ-ष्णा ना पसराल । भ्रमांतुनी कसराल, आदिपुरुषाला अनुसराल हो ॥

भग० ॥ २ ॥ विचार हा विवराल, निरंतर भजनीं वावराल । निजशांतीला वराल, चंचळ मांनस हें आवराल हो ॥ भग० ॥ ३ ॥ योगाभ्यासें झराल अक्षय प्रेमातें पाझराल । निरंजन वनीं ठराल, तेव्हां नित्यानंदें भराल, हो ॥ भग० ॥ ४ ॥ सोहिरा ह्मणे कर्म हराल, केंवी जन्मुनि पुढतीं मराल । चित्त चैतन्यीं सुधराल, तेव्हां उभय कुळें उद्धराल हो ॥ भग० ॥ ५ ॥

## पदें—श्रीतुकारामकृत.

### पद ५८ वें.

पुरे एकचि पुत्र माय पोटीं । हरि स्मरणें उद्धरी कुळें कोटी ॥ ध्रु० ॥
धन्य वंशीं जन्मला भगीरथ । गंगा आणोनी पूर्वज केले मुक्त ॥ पुरे० ॥१॥
गौतमानें आणिलि गोदावरी । आपण तरोनि दुजयासी तारी ॥ पुरे० ॥२॥
पांचा वर्षांचें ध्रुव बाळ तान्हें । अढळ पदीं स्थापिलें बहूमानें ॥ पुरे० ॥३॥
तेज:पुंज शीतळ सौख्यदानीं । एक चंद्रप्रकाश त्रिभुवनीं ॥ पुरे० ॥ ४ ॥
पहा कैसा तो पुंडलीक धीट । उभा केला वैकुंठनायक ॥ पुरे० ॥ ५ ॥
रामरूपीं जन्मला किर्तिवंत । अंजनीचे उदरीं हनुमंत ॥ पुरे० ॥ ६ ॥
तुका ह्मणे हरिसी विन्मुख । गांधारिचे उदरीं शत मूर्ख ॥ पुरे० ॥ ७ ॥

### पद ५९ वें.

पोटापुरतें देईं । मागणें लयि नाहीं लयि नाहीं ॥ ध्रु० ॥ पोळी साजुक अथवा शिळी । देवा देईं भुकेच्या वेळीं ॥ माग० ॥ १ ॥ वस्त्र नव अथवा जुन । देवा देईं अंग भरून ॥ माग० ॥ २ ॥ देवा कळणा अथवा कोंडा। आह्मां देईं भुकेच्या तोंडा ॥ माग० ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां । नका करूं पायापरता ॥ माग० ॥ ४ ॥

## पदें—श्रीएकनाथकृत.

### पद ६० वें.

नाथाच्या घरची उलटी खूण पाण्याला मोठी लागली तहान ॥ ध्रु० ॥
एक मी बाई नवल देखीलें । वळचणीचें पाणी आड्याला गेलें ॥ नाथा० ॥१॥
शेत पेरिलें त्याला कणसें आलीं ॥ राखणवाल्याला त्याणें खादलें ॥ नाथा० ॥ २ ॥ आंत पाणी बाहेर पाणी । पाण्याला पाणी आलें धावोनी ॥ नाथा० ॥ ३ ॥ मडकें खाउनी भात टाकूनी दिला । बकऱ्याच्या पुढें देव

कापीला ॥ नाथा० ॥ ४ ॥ एकनाथ ह्मणे मार्ग हा उलटा । जाणेल तोचि एक गुरुचा बेटा ॥ नाथा० ॥ ५ ॥

## पद ६१ वें.

सगुण चरित्रें परम पवित्रें सादर वर्णावीं । सज्जनवृंदें मनोभावें आधीं वंदावीं ॥ ध्रु० ॥ संतसंगें अंतररंगें नाम बोलावें । कीर्तनरंगीं देवासन्निध सुखें डोलावें ॥ सगु० ॥ १ ॥ भक्तिज्ञानाविरहित गोष्टी इतरा न कराव्या । प्रेमभरें वैराग्याच्या युक्ति विवराव्या ॥ सगु० ॥ २ ॥ जेणेंकरुनी मूर्ति ठसावे अंतरिं श्रीहरिची । ऐशी कीर्तनमर्यादा हे संतांचे घरची ॥ सगु० ॥ ३ ॥ अद्वय भजनें अखंड स्मरणें वाजवि करताळी । एकाजनार्दनीं मुक्ती होय तत्काळीं ॥ सगु० ॥ ४ ॥

# पदें—श्रीविठोबाअण्णाकृत.

## पद ६२ वें.

रामकृष्ण नरहरे स्वामिन् रामकृष्ण नरहरे ॥ कधिं करिशील बा दया दयाळा गर्भवास हा पुरे ॥ ध्रु० ॥ काय करूं मी बरें सांगा काय० ॥ कळों येति मज माझे दोषगुण चित्त परी नावरे ॥ १ ॥ विषयीं मन नावरे । सदोदित विषयीं० ॥ काम क्रोध हे चोर लुटति मज प्राण होत घाबरे ॥ २ ॥ धांव धांव धांवरे सत्वर धांव धां० ॥ बुडतों भवसागरीं दीन हा उद्धरिं आपुल्या करें ॥ ३ ॥ विचार मज न स्फुरे कांहीं विचार० ॥ केविं गती होईल ह्मणुनियां, जिव हा अंतरिं झुरे ॥ ४ ॥ प्रार्थितसें आदरें आतां एक ॥ प्रा० ॥ असें करीं तव नाम निरंतर पंत विठ्ठल स्मरे ॥ ५ ॥

## पद ६३ वें.

राघवा तुझा तुझा लागो छंद । न जडो दुर्मतिचा गंध ॥ रा० ॥ ध्रु० न रुचो विषय विषय विषावाणी । आवडो संतांची वाणी ॥ १ ॥ अंगीं रोमांच रोमांच नयनपाणी । झरपो तुझि गातां गाणीं ॥ २ ॥ विठ्ठलपंतासी पंतासी हेंचि काम । आवडो सदा तुझें नाम ॥ रा० ॥ ३ ॥

## पद ६४ वें.

रामराया दे मज भेटी । होत असें मी फारचि कष्टी ॥ ध्रु० ॥ अपराध हे माझे कोटी । दयाघना तूं घालीं पोटीं ॥ रा० ॥ १ ॥ काय वदूं मी

फारचि गोष्टी । तुजविण रामा सारिंहि खोटीं ॥ रा० ॥ २ ॥ कृपासागरा तव या साठीं । लागलीसे आशा मोठी ॥ रा० ॥ ३ ॥ विठ्ठलाचा बा जगजेठी । दीनावरि तूं द्यावी दृष्टी ॥ रा० ॥ ४ ॥

## पद ६५ वें.

दयानिधे रामराया । आवरिं आपुली माया ॥ ध्रु० ॥ खोली कळुनी जाया काया । परि लोभ त्यावरि वांयां ॥ द० ॥ १ ॥ चुकोनियां आपुल्या ठाया । लागलोंसे गोते खाया ॥ द० ॥ २ ॥ प्रार्थितसें वंदुनि पाया । करा करुणेची छाया ॥ द० ॥ ३ ॥ पंत विठ्ठलासि द्याया । लावीं निजगुण गाया ॥ दया० ॥ ४ ॥

## पद ६६ वें.

करिं अतित्वरा । घडि घडि घडि पल पल जप, अमृतधाम रामनाम, धरुनि आदरा ॥ करिं० ॥ ध्रु० ॥ अंतसमय परम घोर, दोषत्रय करिति जोर, घुरु घुरु घुरु कंठ होय, भरिल भ्रम हरिल स्मृति, होसि घाबरा ॥ करि० ॥ १ ॥ अति दुर्धर अपरिहरा, येईल जंव तुजसि जरा, लट लट लट हालेल मान, धनुसमान तनु पुमान, होत बावरा ॥ करि० ॥ २ ॥ जो इंद्रियसंघदक्ष, तो निजकल्याण दक्ष, त्यज वट वट खटपट उगि । झटपट करिं कपट, रहित, भज रमावरा ॥ करि० ॥ ३ ॥ विनवि पंत विठ्ठल शम, किमपि धरीं विरम विरम, विषयिं नरम, अमरमहित चरमतनु परमलाभ, न करिं मातेरा ॥ क० ॥ ४ ॥

## पद ६७ वें.

मना, कांहीं तुला, नाहिं पहा लाज कशीरे ॥ ध्रु० ॥ परकामिनि परधनासि । विविध विपयसाधनांसि । जपसि टपसि मांजरसा नकळुनियां पडसि फशीं रे ॥ म० ॥ १ ॥ निगमविहित त्यजुनि मति । वरिसि स्वहितार्थ कुमति । नेतिल भट यमसदनीं । पडशी मग अभरवशीं रे ॥ म० ॥ २ ॥ तिळभरि जरि भूतदया । बाणेना तव हृदया । तरि मग कवण्या देहीं । श्रीहरिला आळवशी रे ॥ म० ॥ ३ ॥ धरुनि सुहृदसंतसंग । विठ्ठल-भजनींच रंग । आयुव्यय व्यर्थ करुनि । पावसि भलत्याच कुशी रे ॥ म० ॥ ४ ॥

# पदें—श्रीसमर्थ रामदासकृत.

## पद ६८ वें.

ज्या ज्या वेळे जें जें होईल तें तें भोगावें । विवेकाला विसरुनि आपण कष्टी कां व्हावें ॥ ध्रु० ॥ एकदां एक वेळ बहु सुखाची गेली । एकदां एक वेळ जिवा बहु पीडा झाली ॥ ज्या० ॥ १ ॥ एकदां मागूं जातां मिळती षड्रस पक्वान्न । एकदां मागूं जातां नमिळे भाजीचें पान ॥ ज्या० ॥२॥ सुकृत दुष्कृत दोन्ही पूर्वदत्ताचें फळ । ऐसें प्राणी जाणेना तो मूर्खचि केवळ ॥ ज्या० ॥ ३ ॥ देह दुःखास मूळ ऐसें बरवें जाणोन । सुखदुःख विरहित रामदास आपण ॥ ज्या० ॥ ४ ॥

## पद ६९ वें.

घटका गेली पळें गेलीं तास वाजे झणाणा । आयुष्याचा नाश होतो राम कां रे ह्मणाना ॥ घ० ॥ १ ॥ एक प्रहर दोन प्रहर तीन प्रहर गेले । विषयाच्या संगामुळें चारी प्रहर गेले ॥ घ० ॥ २ ॥ रात्र कांहीं झोंप कांहीं स्त्रीसंगें गेली । ऐशी आठां प्रहरांची वासलाद झाली ॥ घ० ॥ ३ ॥ दास म्हणे तास वाजे सकळां स्मरण देतो । वेळोवेळां राम ह्मणा ह्मणोनि झणकारितो ॥ घ० ॥ ४ ॥

## पद ७० वें.

गुरु दातारें दातारें । अभिनव कैसें केलें ॥ ध्रु० ॥ एकचि वचनें न बोलत बोलुनि । मानस विलया नेलें ॥ गु० ॥ १ ॥ भूतसंगें कृत नैश्वर ओझें । निजबोधें उतरीलें ॥ गु० ॥ २ ॥ दास म्हणे मज मीपणविरहित । निजपदीं नांदविलें ॥ गु० ॥ ३ ॥

## पद ७१ वें.

श्रीगुरुचें चरणकंज हृदयीं स्मरावें ॥ ध्रु० ॥ निगम निखिल साधारण सुलभाहुनी सुलभ बहू । इतर योगयाग विषम पंथिं कां शिरावें ॥ श्री० ॥१॥ नरतनु दृढ नावेसी बुडवुनि अतिमूढपणें । दुष्ट नष्ट कुकर सूकर तनु कां फिरावें ॥ श्री० ॥ २ ॥ रामदास विनवी तुज अजुनि तरी समज उमज । विषयवीष पेउनियां फुकट कां मरावें ॥ श्री० ॥ ३ ॥

## पद ७२ वें.

मारुति सख्या बलभीमा हो ॥ ध्रु० ॥ अंजनिचें वचनांजन लेऊनि । दाखविशी बळसीमा रे ॥ मा० ॥ १ ॥ वज्रतनु बलभीमपराक्रम । संगित-गायन सीमा रे ॥ मा० ॥ २ ॥ दास ह्मणे हो रक्षीं आह्मां । त्रिभुवन-पालन सीमा रे ॥ मा० ॥ ३ ॥

# पदें—श्रीकेशव स्वामिकृत.

## पद ७३ रें.

स्वयंब्रह्म जो आपणची झाला । देव मस्तकीं वंदिती त्याला ॥ ध्रु० ॥ ज्याचे दृष्टिसि सृष्टिच नाहीं । देहीं असोनी पूर्ण विदेही ॥ स्व० ॥ १ ॥ जेथें जाणीव नेणीव नाहीं । तेथें कांहींच उरलें नाहीं ॥ स्व० ॥ २ ॥ ब्रह्म होउनी ब्रह्मीं जो खेळे । केशव तयाचे चरणीं लोळे ॥ स्व० ॥ ३ ॥

## पद ७४ वें.

धांव विभो करुणाकर माधव देव दयानिधे देवकिनंदन ॥ ध्रु० ॥ हे करुणाकर दीनजनोद्धर हा भव दुस्तर यांतुनि उद्धर ॥ धां० ॥ १ ॥ काम-मदादिक गांजिति हे अति धांव रमापति सेवकहितकर ॥ धां० ॥ २ ॥ जननमरण भय हरण करिं त्वरें चरणिं शरण तव केशव किंकर ॥ धां० ॥३॥

## पद ७५ वें.

घडि घडि घडि चरण तुझे आठवती रामा ॥ ध्रु० ॥ हीनदीन, आस तुझी पूर्णकास आह्मां ॥ घ० ॥ १ ॥ मात तात भ्रात नाथ तूंचि एक पाहीं ॥ घ० २ ॥ केशव ह्मणे करीं दया शरण तुझे पायीं ॥ घ० ॥ ३ ॥

## पद ७६ वें.

संतसमागम कराचिना । शांति दया मनिं धराचिना । चिन्मय राघव वराचिना । झडकरि कांहो तराचिना ॥ सं० ॥ १ ॥ संतसमागम काशी रे । क्षणभर वस्तिशि जाशी रे । नासति पातकराशी रे । पावसि परम पदासी रे ॥ संत० ॥ २ ॥ कामतरूवर तोडावा । संशय अवघा मोडावा । सर्वसमागम सोडावा । केशव स्वामी जोडावा ॥ संत० ॥ ३ ॥

# पदें—श्रीअमृतरायकृत.

## पद ७७ वें.

होउनि गोसावी गोसावी । हरिकथाचि परिसावी ॥ ध्रु० ॥ गमन नसे ज्या गांवीं । तेथिल वाट कशास पुसावी ॥ होउनि० ॥ १ ॥ सुखें मिळो खंबायत । अथवा भगवींही नेसावीं ॥ होउनि० ॥ २ ॥ भिक्षा मागुनि निस्पृहतेनें सत्संगति पोसावी ॥ होउनि० ॥ ३ ॥ दुर्वाक्यें सोसुनियां आपण अमृतवृष्टि वर्षावी ॥ होउनि० ॥ ४ ॥

## पद ७८ वें.

त्याचा हरि विकला, हरि विकला । प्रेमें हरिगुण शिकला ॥ ध्रु० ॥ दो चौ दिवसां सेवी । भाजी चुका चाकवत सुकला ॥ त्या० ॥ १ ॥ कर्ज नसे कोणाचें । देण्या घेण्यापासुनि मुकला ॥ त्याचा० ॥ २ ॥ संतुष्ट यदृच्छालाभें । आनंद ज्याच्या हृदयीं पिकला ॥ त्याचा० ॥ ३ ॥ आधिं वदे अमृतेश्वर । जो नर धनकामिनीवर थुकला ॥ त्याचा ॥ ४ ॥

## पद ७९ वें.

अशाश्वत संग्रह कोण करी ॥ ध्रु० ॥ चिरगुट चिंध्या जोडोनि कंथा । गोदडी हेचि बरी ॥ अशा० ॥१॥ नित्य नूतन देईल माधव । भिक्षा तेचि बरी ॥ अशा० ॥ २ ॥ कोण करी घर सोपे माड्या । विवरीं वस्ति बरी ॥ अशा० ॥ ३ ॥ अमृत ह्मणे मज भिक्षा डोहळे । उठति अशा लहरी ॥ अशा० ॥ ४ ॥

## पद ८० वें.

हरी मज कसा करिल भवपार ॥ ध्रु० ॥ तन मन धन विषयावरि वळतें भजनीं आळस फार ॥ ह० ॥१॥ स्वात्मबुद्धि विचारुनि पाहीं । कोणिं न केला उपकार ॥ ह० ॥ २ ॥ अमृत ह्मणे तुह्मि भजा निरंतर । श्रीधरगुरुचे पाय ॥ ह० ॥ ३ ॥

## पद ८१ वें.

चिंता प्राण्याची हरिला ॥ ध्रु० ॥ पक्ष्यां पदरीं संचय कैंचा । चारा पुरवि तयांला ॥ चिं० ॥ १ ॥ कीड मुंगी कांहीं मागत नाहीं । साखर देइ तयांला ॥ चिं० ॥ २ ॥ अमृत ह्मणे हरिघरीं काय उणें । जो जें मागे देइ तयाला ॥ चिं० ॥ ३ ॥

## पद–श्रीधरस्वामीकृत.

### पद ८२ वें.

सखया रामा, विश्रांति तुझिये नामीं । म्हणउनि मजला ने त्वरें निज सुख धामीं ॥ सखया० ॥ ध्रु० ॥ अवचट सुकृतें नरदेहा झाली भेटी । पशु सुत जाया, धन, धामीं प्रीती मोठी । माझीं माझीं ह्मणुनि म्यां धरिलीं पोटीं । यांच्या संगें भोगिल्या दुःखकोटी ॥ सखया० ॥ १ ॥ सोडुनि स्वहिता धांवलों दिशा दाही । शववत झालों मागुता कौतुक पाहीं । परि खळ जन हे नेदिती कवडी तेही । परि हे आशा पापिणी लाजत नाहीं ॥ सखया० ॥२॥ जंववरि दृढता तंववरि या तनुची प्रीती । जर्जर झाल्या निंदक हे अवघे होती । यांचीं दुःखें तुजला मी सांगूं किती । म्हणउनि येतो श्रीधर काकुळती ॥ सखया० ॥ ३ ॥

## पदें–श्रीआनंदतनयकृत.

### पद ८३ वें.

रत हरिपदकमलकंद सेवि मनोभ्रमरा ॥ ध्रु० ॥ दुष्ट दैत्य दमुनि देत निज भक्ता थारा । द्रुततर मनिं धरुनि भाव सांडि भवपसारा ॥ रत०॥ १॥ शुक सनकादिक मुनी जपति ज्या आधारा । सुर वर मुनि गाति मुखें नित्य निराकारा ॥ रत० ॥ २ ॥ पावन पदरजेंकरुनि गौतममुनिदारा निशिदिनिं आनंदतनय गाय वेद सारा ॥ रत० ॥ ३ ॥

### पद ८४ वें.

दाखवीं दिव्य पाय दयानिधे रामा ॥ ध्रु० ॥ हीन दीन आस तुझी, कास पूर्ण आह्मां । धरावया पाहतसें अगा घनश्यामा ॥ दाख० ॥ १ ॥ माय बाप बंधु गोत्र, मित्र तूंचि आह्मां । तुजवीण कोण असे सांग सख्या रामा ॥ दा० ॥ २ ॥ सखया आनंदतनय ह्मणे आगा गुणग्रामा । शीण-भाग हरीं त्वरें पुसोनियां धामा ॥ दाख० ॥ ३ ॥

### पद ८५ वें.

कृपाघना तुज कां न ये करुणा । शुकसनकादिक वंदिति चरणा ॥कृ० ॥ ध्रु० ॥ उत्कंठा मनिं, पाय पहाया । लागली निशिदिनिं, जगदाभ-

रणा ॥ कृपा० ॥ १ ॥ अंतरिंचा तूं, जाणसि आशय पूर्ण करिशि कधिं अघसंहरणा ॥ कृपा ॥ २ ॥ ध्यान भजन मी कांहींच नेणें । दास ह्मणवितों पतितोद्धरणा ॥ कृपा० ॥ ३ ॥

## पदें—श्रीशिवदिनकेसरिकृत.

### पद ८६ वें.

भाव धरा रे आपुलासा देव करा रे । कोणी काय ह्मणो यासाठीं । बळकट प्रेम असावें गांठीं । निंदास्तुतिवर लाउनि काटी । मी तूं हरा रे ॥ आपुलासा० ॥ १ ॥ सकाम साधन सर्वेहि सांडा । निष्कामें मुळ भजनीं मांडा । नाना कुतर्कवृत्तिसि दवडा । आली जरा रे ॥ आपु० ॥ २ ॥ दुर्लभ नरदेहाची प्राप्ती पुन्हा न मिळे हा कल्पांतीं । ऐसा विवेक जाणुनि चित्तीं । गुरुसीं वरा रे ॥ आपु० ॥ ३ ॥ केशरिनाथ गुरूचे पायीं । सृष्टि आजि बुडाली पाहीं । शिवदिनिं निश्चय दुसरा नाहीं । भक्तसखा रे ॥ आपु० ॥ ४ ॥

### पद ८७ वें.

माझी देवपुजा देवपुजा । पाय तुझे गुरुराजा ॥ माझी० ॥ ध्रु० ॥ गुरुचरणाची माती । तेच माझी भागीरथी ॥ माझी० ॥ १ ॥ गुरुचरणाचा बिंदु । तोची माझा क्षीरसिंधु ॥ माझी० ॥ २ ॥ गुरुचरणाचें ध्यान । तेंचि माझें संध्यास्नान ॥ माझी० ॥ ३ ॥ शिवदिनकेशरि पायीं । सद्गुरूवांचुनी दैवत नाहीं ॥ माझी० ॥ ४ ॥

## पद—श्रीरामजोशीकृत.

### पद ८८ वें.

भज भज भव जलधिमाजि मनुजा शिवाला ॥ ध्रु० ॥ धरिशिल दृढ चरण कमल, घडिभरि तरि करुनि विमल । तरिच सकल पाप शमल, त्यज रे भवाला ॥ भज० ॥ १ ॥ सांडुनियां विषयवमन, झडकरि करिं षडरिदमन । पूजिं मन हें करुनि सुमन । गिरिजाधवाला ॥ भज० ॥ २ ॥ सावध हो करिशि काय, शंकर गुरु बाप माय । चिंतुनि कवि रामपाय हृदयीं निवाला ॥ भज भज० ॥ ३ ॥

# पदें—श्रीमध्वमुनीकृत.

## पद ८९ वें.

जाणों हरिचे पाय । आह्मी जाणों हरिचे पाय ॥ ध्रु० ॥ नेम न जाणों यमहि न जाणों । नेणों अन्य उपाय ॥ आ० ॥ १ ॥ परिस देउनी सोनें घेणें । जळो त्याचा व्यवसाय ॥ आ० ॥ २ ॥ कृष्णाचें पद सोडुनि आह्मी । मुक्ति वरूं हय हाय ॥ आह्मी० ॥ ३ ॥

## पद ९० वें.

तूं माझा यजमान । रामा तूं माझा यजमान ॥ ध्रु० ॥ जननीजठरीं रक्षियलें मज । पोसुनि पंचहि प्राण ॥ रामा० ॥ १ ॥ बाहेर निघतां मातेचे स्तनीं । पय केलें निर्माण ॥ रामा० ॥ २ ॥ ऐसें असतां या पोटाची । कां करूं चिंता जाण ॥ रामा० ॥ ३ ॥ मध्वमुनीश्वर स्वामि रमापति । धरि माझा अभिमान ॥ रामा० ॥ ४ ॥

# पद—श्रीबोधलेकृत.

## पद ९१ वें.

सांगड बांधारे भक्तीची । रघुनाथ नामाची ॥ ध्रु० ॥ संसारसागर सागर । भरला जातो पूर ॥ सांगड० ॥ १ ॥ लाटा उसळती विषयाच्या । बहुत प्रपंच्याच्या ॥ सांगड० ॥ २ ॥ नरहरि बोधला बोधिला । हरिनामीं रंगला ॥ सांगड० ॥ ३ ॥

# पद—श्रीआनंदतनयकृत.

## पद ९२ वें.

कांरे नाठविसी कमलनयन वासुदेव ॥ ध्रु० ॥ जपति जया संतसनक सकळजनां जननिजनक ॥ कांरे० ॥ १ ॥ कलुषहरण विमलचरित । करुनि निजानंदभरित ॥ कांरे० ॥ २ ॥ विचरे आनंदतनय । हृदयिं धरुनि नंदतनय ॥ कांरे० ॥ ३ ॥

# पदें—श्रीकबीरकृत.

## पद ९३ वें.

तूं तो राम सुमर जग लढवा दे ॥ ध्रु० ॥ कोरा कागत काली छाई लिखत पढत वाकु पढवा दे ॥ तूं० ॥ १ ॥ रंडी चंडी शितला देवी

फत्तर पुजत वाकु पुजवा दे ॥ तूं० ॥ २ ॥ हत्ती चलत है अपने गतमो कुतर भुकत वाकु भुकवा दे ॥ तूं० ॥ ३ ॥ कहत कबीरा सुनभाई साधू नरक पचत वाकु पचवा दे ॥ तूं० ॥ ४ ॥

## पद ९४ वें.

इस तनधनकी कौन बढाई, देखत नैनोंमें मट्टि मिलाई ॥ ध्रु० ॥ अपने खातर मेहेल बनाया । आपही जाकर जंगल सोया ॥ इस० ॥ १ ॥ हाड जले जसी लकडीकी मोली, बाल जले जैशी घासकी पोली ॥ इस०॥२॥ कहत कबीरा सुनो मेरे गुनियां। आप मुवे पिछे डुबगई दुनियां ॥इस०॥३॥

## पद ९५ वें.

गुरुबिन कौन बतादे बाट । बडाबिकट जमघाट ॥ ध्रु० ॥ भ्रांतीकी बाडी नदिया बिचमो, अहंकारकी लाट ॥ गु० ॥ १ ॥ मदमत्सरकी धारा बरसत, माया पवन घनदाट ॥ गु० ॥ २ ॥ काम क्रोध दो पर्वत ठाडे लोभ चोर संगात ॥ गु० ॥ ३ ॥ कहत कबीरा सुनो मेरे गुनिया, क्यौं करना बौबाट ॥ गु० ॥ ४ ॥

# पदें—श्रीपद्मनाभस्वामीकृत.

## पद ९६ वें.

राम भजावा रे ॥ तो हा ॥ राम भजावा रे ॥ ध्रु० ॥ निर्गुण निश्चळ निष्कल्मष जो ॥ धीस विसावा रे ॥ रा० ॥ १ ॥ सच्चिद्घन परिपूर्ण परात्पर ॥ सिंधु सुखाचा रे ॥ रा० ॥ २ ॥ सर्पा जैसा दोर तसा जो ॥ बाळा विश्वा रे ॥ रा० ॥ ३ ॥ माया योगें मिरवितसे जो ॥ सर्वज्ञत्वा रे ॥ रा० ॥ ४ ॥ बुद्धिगुणें जो कर्ता भोक्ता ॥ ह्मणवी आपणा रे ॥ रा० ॥ ५ ॥ तो मतिसाक्षी जाणे सर्वा ॥ भेदा भावा रे ॥ रा० ॥ ६ ॥ तो हा अंबुजनाभ अरूपचि ॥ सुरूप ध्यावा रे ॥ रा० ॥ ७ ॥

## पद ९७ वें.

नाचतो पहा ॥ दत्त ॥ नाचतो पहा ॥ ध्रु० ॥ स्तविति जया वेद शेष व्याप्त जयें हें अशेष ॥ अविषय जो निर्विशेष ईश तोच हा ॥ प्रेमें ॥ ना० ॥ १ ॥ स्वांघ्रिकमलभृंगपाप ॥ जो हरितो त्रिविधताप ॥ विश्वा जो आईबाप ॥ लेपरहित हा ॥ देवो ॥ ना० ॥ २ ॥ बुधिसाक्षि शुद्धबोध सिद्धगुरुच नित्यसिद्ध ॥ तद्धित जे पूर्णबद्ध ॥ विद्ध भक्ति हा ॥ माझा ॥

ना० ॥ ३ ॥ कंजनाभ विद्यांजन ॥ लावुनि देखोत सुजन ॥ ज्यातें प्रिय आत्मभजन ॥ त्यजुनियां गुहा ॥ आत्मा ॥ ना० ॥ ४ ॥

## पद ९८ वें.

हाय हाय केलें काय जन्म घेउनी ॥ देखिलि ना दत्तमाय सगुण लोचनीं ॥ ध्रु० ॥ विषयविषा पीयूषचि भक्षि मानुनी ॥ मरणसमय ठाकलाच जवळ येउनी ॥ चढलि बळें वासनादिकांस ह्या दुगी ॥ भक्ति आतां साध्य कसी होय या क्षणीं ॥ हा० ॥ १ ॥ ध्यान करूं बघतों तैं विषय येतसे ॥ राम ह्मणों प्रवर्तता लांब येतसे ॥ हरिगुणश्रवणार्थ चित्त शांत नुरतसे ॥ ध्यानिं नुरे ऐकियलें चित्त देउनी ॥ हा० ॥ २ ॥ आसन घालीन तरी देह स्निग्ध ना ॥ काष्ठोपम अवयव हे योग्य लवति ना ॥ वांकली कटि सरळ करायास येइना ॥ प्रार्थि दयें पद्मनाभ तार धांवुनी ॥ हा० ॥ ३ ॥

# पदें—श्रीनुरीदासकृत

## पद ९९ वें.

मन दुग्धाके पट खोल । तोहे राम मिले ॥ ध्रु० ॥ दश इंद्री बंदकर मत बोल ॥ तो० ॥ १ ॥ काम क्रोधकु त्याग करके साधु । आपनी हदमे अन-हदका बजा ढोल ॥ तो० ॥ २ ॥ मनका माला मनमें जपकर घटमें आपणें तूं आपी बोल ॥ तो० ॥ ३ ॥ घटमें तेरे रामही राम है । मनसे रामरट फिर आंख खोल ॥ तो० ॥ ४ ॥ सद्गुरु शरण जाकर शीस नवाकर रामरस पी मत ढोल ॥ तो० ॥ ५ ॥ काम क्रोधकी तनपर भस्म लगाकर आलख निरं-जनका बजा ढोल ॥ तो० ॥ ६ ॥ राम मिलनकी राहा निराली । समजकर चल कुवां है खोल ॥ तो० ॥ ७ ॥ नुरीदासके ग्यान शीखकर घर बेठे मोती ले अनमोल ॥ तो० ॥ ८ ॥

## पद १०० वें.

जनम जनमका सार्थक करले । राम हरीका स्मरण करले ॥ ध्रु० ॥ झूटी काया झूटी माया । सत नामसे प्रेम करले ॥ ज० ॥ १ ॥ बालबच्चे कोई काम न आवे । आपणा सवदा आपी करले ॥ ज० ॥ २ ॥ मतजा खाली मतजा खाली । दान धरम कुच करले ॥ ज० ॥३॥ पंडित काजी दोनो अंधे ।

ए डूबे तूं तरले ॥ ज० ॥ ४ ॥ नुरीदासका कहना सुनकर । मरणे के आगे तूं मरले ॥ ज० ॥ ५ ॥

## पद १०१ वें.

हरिनाम भजो मनसे । आपने तनसे धनसे ॥ ध्रु० ॥ साधु संतकी संगत करके । निकल ज्या चौर्‍यांशी बनसे ॥ ह० ॥ १ ॥ पूर्वजन्मका झगडा छोडो । अरे राम रहो मनसे ॥ ह० ॥ २ ॥ तेतीस कोटी तेरे पोटीं ए सब निकले तनसे ॥ ह० ॥ ३ ॥ काशी तीरथ घरमें होवे । अजपा जप जपो मनसे ॥ ह० ॥ ४ ॥ कहत नुरीदास सुन भाई साधु । ग्यान पाया दर्शनसे ॥ ह० ॥ ५ ॥

## पद १०२ वें.

क्यूं बना तूं दीवाना दीवाना । हरीनामको जपले सीयाना सीयाना ॥ ध्रु० ॥ रामनामकी फेरी लगाकर । प्रेमरस हरदम पीना पीना ॥ क्यूं० ॥ १ ॥ किसका मेरा किसका तेरा । मशान तेरा ठिकाना ठिकाना ॥ क्यूं० ॥ २ ॥ सद्गुरु नामकी धुनी रमाकर । घर घर आलख जगाना जगाना ॥ क्यूं० ॥ ३ ॥ मनका देवल तनकी मसजीद । रमकर आपी राम कहाना कहाना ॥ क्यूं० ॥ ४ ॥ सद्गुरुसेवासे फल कुच पावे । करले मनसे कितना मनाना मनाना ॥ क्यूं० ॥ ५ ॥ आत्मग्यानको ग्यानी जाणे । क्या जाणे मुरख दीवाना दीवाना ॥ क्यूं० ॥ ६ ॥ साधु बनकर ग्यान न जाणा । फीर नही कामका साधु सीयाना सीयाना ॥ क्यूं०॥७॥ नुरीदासके घटमें नुरी । नुरी रामका मंगल गाना गाना ॥ क्यूं० ॥ ८ ॥

# पद—श्रीरंगनाथस्वामीकृत.

## पद १०३ वें.

ब्रह्ममय वृत्ति झाली आतां काय उणें ॥ अहंकार दग्ध झाला स्वात्मसुख घेणें ॥ ध्रु० ॥ ज्ञानदीप लाउनि ज्योती तिमिरनाश केला । मजमाजी पाहुनि नाथा निज लाभ झाला ॥ ब्र० ॥ १ ॥ जीव शीव ऐक्य झालें जगत् ब्रह्म दीसे । पशु पक्षी नाना याती एकाकार भासे ॥ ब्रह्म० ॥२॥ बोलुनियां मुनी गेले आतां काय बोलूं । पूर्ण शेजेवरी आह्मी रंगीं रंगुनी डोलूं ॥ ब्रह्म० ॥ ३ ॥